२. जो कांपत असणाऱ्या पृथिवीला दृढ करिता झाला, जो चंचल पर्वतांला स्तब्ध करिता झाला, जो विस्तीर्ण अंतरिक्ष व्यवस्थापिता झाला, जो द्यूला धारण करिता झाला, तो हे जन हो, इंद्र [ असें समजा ].

2. He who made solid the trembling earth, who made firm the mobile mountains, who arranged in order the vast firmament, and who supported the heaven,—that, o people, is Indra.

---

कोण आहे, तो कसा आहे, त्याचा पराक्रम काय अशी शङ्का लोक घेऊं लागले, तेव्हां त्यांचा संशय जाण्यासाठीं इंद्राचें खरें स्वरूप काय आहे तें या सूक्तांत ऋषीनें सांगितलें आहे. आणि ईश्वर या नांवाचा जरी उपयोग यांत केलेला नाहीं, तरी ईश्वराच्या गुणाचा बोध कसकसा पुरातन आर्यलोकांस होत गेला तें या सूक्तावरून कांहींसें समजतें.

---

२. 'पृथिवी जशी आतां अचल आहे तशी पूर्वी नव्हती आणि पर्वतहि आपापल्या ठिकाणीं जसे स्तब्ध आहेत तसे पूर्वी नव्हते. अंतरिक्ष जसें आतां व्यवस्थित आहे तसें प्रथम नव्हतें, आणि द्युलोक जो आतां महा मंडपासारिखा अत्युच्च जडला जाऊन प्रकाशत आहे, तसा पूर्वी नव्हता. तर आतांची जी ही स्थिति आहे ती इंद्रानें केली' असें तात्पर्य.

यो हत्वाहिमरिणात्सप्त सिन्धून्यो गा उदाजदपधा वलस्य ।
यो अश्मनोरन्तरग्निं जजान संवृक्समत्सु स जनास इन्द्रः ॥ ३ ॥
यः । हत्वा । अहिम् । अरिणात् । सप्त । सिन्धून् । यः । गाः । उत्ऽआजत् । अपऽधा । वलस्य ।
यः । अश्मनोः । अन्तः । अग्निम् । जजान । सम्ऽवृक् । समत्ऽसु । सः । जनासः । इन्द्रः ॥ ३ ॥

येनेमा विश्वा च्यवना कृतानि यो दासं वर्णमधरं गुहाकः ।
श्वघ्नीव यो जिगीवाँ लक्षमाददर्यः पुष्टानि स जनास इन्द्रः ॥४॥
येन । इमा । विश्वा । च्यवना । कृतानि । यः । दासम् । वर्णम् । अधरम् । गुहा । अकरित्यकः ।
श्वघ्नीऽइव । यः । जिगीवान् । लक्षम् । आदत् । अर्यः । पुष्टानि । सः । जनासः । इन्द्रः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. यः अहिं ( =सर्पाकारमेघलक्षणं वृत्रं ) हत्वा सप्त सिन्धून् (=सप्त नदीः=मेघोदकानि ) अरिणात् ( =प्रैरयत् ) यो वलस्य ( =वलनामकस्यासुरस्य ) अपधा (=अपधायाः सकाशात्=तत्कर्तृकान्निरोधात् ) गा उदाजत् (=मेघोदकरूपाः सूर्यादिज्योतीरूपा वा गा निरगमयत् ) यः अश्मनोरन्तः ( =अत्यन्तमृदुरूपयोर्मेघयोर्मध्ये ) [ वैद्युतम् ] अग्निं जजान ( =उत्पादयामास ) [ यश्च ] समत्सु संवृक् ( =सम्यक्छेदनकर्ता शत्रुनाशको) [ भवति ] स हे जनासः (=जनाः), इन्द्र [ इति जानीत] ॥

४. येन इमा विश्वा च्यवना ( =इमानि दृश्यमानानि सर्वाणि भूतानि ) कृतानि ( =रचितानि ) यो दासं वर्णं ( =दस्युसंबन्धिनं वर्णम्=अनार्यान् जनान् ) अधरं गुहा अकः ( =गुहायां गूढस्थाने निकृष्टम् अकरोत्=पादेन निपात्य निकृष्टे निगूढस्थाने निहितवानिव ) यो जिगीवान् श्वघ्नीव ( =जितवान् कितव इव ) अर्यो लक्षं पुष्टानि ( =शत्रोर्लक्षसंख्याकानि धनानि ) आदत् ( =गृहीतवान् ) स हे जनासः ( =जनाः ), इन्द्र [ इति जानीत ] ॥

३. जो अहीला मारून सप्त सिंधूंला खालीं सोडून देता झाला, जो गाईंला वलाच्या अटकेपासून मुक्त करिता झाला, जो पाषाणांमध्यें अग्नीला उत्पन्न करिता झाला, [जो] संग्रामांत विजयशील,— तो, हे जन हो, इंद्र [ असें समजा ].

४. ज्याणें हीं सर्व अस्थिर भुवनें निर्माण केलीं, जो अनार्य वर्णाला निर्दाळून टाकिता झाला, जो विजयी द्यूतकाराप्रमाणें शत्रूचीं [एक] लक्ष धनें घेता झाला— तो, हे जन हो, इंद्र [ असें समजा ].

3. He who having slain the Serpent let flow the seven rivers, who liberated the cows from the hiding-place of Vala, who created Agni between the two rocks, the destructive hero in battles—that, o people, is Indra.

4. He by whom all this frail creation was made, who put down the un-Âryan colour, who like a winning gambler took a hundred thousand goods of the enemy— that, o people, is Indra.

---

३. अहीला म्ह. वृत्राला. सू. ३२ मं..१ यावरील टीप पाहा.

'सप्त सिंधूंलो'=' सप्त सिन्धून् ' म्हणजे मेघोदकांला. सू ३५. मं ८. पाहा.

वलासुराच्या अटकेंतून सोडविलेल्या ज्या गाई येथें सांगितल्या, त्या मेघोदकरूपच समजाव्या, अथवा सूर्यादिकांचे जे किरण तद्रूप समजाव्या. ' पाषाणांमध्यें अग्नीला इ. ' म्ह. पाषाणासारिखे दिसणारे जे मेघ ते एकत्र मिसळले म्हणजे जो विद्युद्रूप अग्नि निर्माण होतो तो.

४. 'अनार्य वर्णाला '='दासं वर्णम्.' म्ह. आर्य नव्हत असे जे महार, कोळी, गोंड इत्यादि जातींचे लोक ते. त्यांनां दास अथवा दस्यू असें साधारण नांव वेदकाळी असे. दस्युशब्दाचा चोर असा जो प्राचीन काळापासून एक अर्थ चालू आहे त्याचें कारण असें कीं, हे अनार्य लोक आर्य लोकांची चोरी करीत असत. दास शब्दाचा 'चाकर' असा जो अर्थ आतां प्रसिद्ध आहे, त्याचें कारण असें की, या अनार्य लोकांस आर्यांनीं मागाहून आपले गुलाम केले आणि गुलामकीचा संबंध त्यांच्याशीं ठेवूं लागले. अनार्य लोकांला दास याअर्थी पूर्वी नाव असे याचें एक प्रमाण असें आहे कीं, तेलंग आणि कानडी प्रदेशांत एक प्रकारचे अनार्य लोक, महारांच्या जातीसारिखे आहेत त्यांस अजून दास ( दासरु ದಾಸರು) असें नांव आहे. ते लोक दास म्हणजे गुलाम कधीतरी होते अथवा गुलामकीचें का-

यं स्मा पृच्छन्ति कुह सेति घोरमुतेमाहुर्नैषो अस्तीत्येनम् ।
सो अर्यः पुष्टीर्विज इवामिनाति श्रदस्मै धत्त स जनास इन्द्रः॥५॥७
यम् । स्म । पृच्छन्ति । कुह । सः । इति । घोरम् । उत । ईम् ।
आहुः । न । एषः । अस्ति । इति । एनम् ।
सः । अर्यः । पुष्टीः । विजःऽइव । आ । मिनाति । श्रत् । अस्मै ।
धत्त । सः । जनासः । इन्द्रः ॥ ५ ॥ ७ ॥
यो रध्रस्य चोदिता यः कृशस्य यो ब्रह्मणो नाधमानस्य कीरेः ।
युक्तग्राव्णो योऽविता सुशिप्रः सुतसोमस्य स जनास इन्द्रः॥६॥
यः । रध्रस्य । चोदिता । यः । कृशस्य । यः । ब्रह्मणः । नाधमानस्य ।
कीरेः ।
युक्तऽग्राव्णः । यः । अविता । सुऽशिप्रः । सुतऽसोमस्य । सः । ज-
नासः । इन्द्रः ॥ ६ ॥

---

भाषायाम्.

५. यं घोरं स कुहेति पृच्छन्ति स्म ( =शत्रूणां घातकः श्रेष्ठः स क्वास्तीति यद्विषये प्रश्नं कुर्वन्ति ) उत ( =अपि च ) एष नास्तीति ईम् एनमाहुः ( =एष तवेन्द्रो नास्त्येवेति यद्विषय आहुः केचिद्वदन्ति ) स विज इव ( =उद्वेजको हरणशीलो) [ द्यूतकार इव ] अर्यः पुष्टीः ( =शत्रोर्धनानि ) आ मिनाति ( =हिनस्ति=हरति ) । अस्मै श्रत् धत्त ( =तस्मै श्रद्धत्त=स इन्द्रोस्तीति विश्वासं कुरुत ) । स हे जनासः ( =जनाः), इन्द्र [ इति जानीत ] ॥

६. यो रध्रस्य ( =समृद्धस्य ) चोदिता ( =प्रेरयिता ) यः कृशस्य ( =अल्पस्व= दरिद्रस्य ) यो ब्रह्मणः ( =ब्रह्मणः उपासनायाः कर्तुरुपासकस्य ) नाधमानस्य कीरेः ( =याचमानस्य स्तोतुश्च ) [ चोदिता ] यो युक्तग्राव्णः (=अभिषवार्थं संयुक्तग्राव्णः) सुतसोमस्य ( =अभिषुतसोमस्य ) [ यजमानस्य ] सुशिप्रः ( =शोभनवदनः) अविता ( =रक्षिता ) [ भवति ] स हे जनासः ( =जनाः), इन्द्र [ इति जानीत ] ॥

---

हीं काम करीत अथवा करितात असें नाहीं, दास हें त्या जातीचेंच नांव आहे.
'लक्ष धनें '=' लक्षं पुष्टानि ' आ- म्हांला हाच अर्थ उत्तम दिसतो. त्याला अडचण इतकीच कीं, 'लक्ष' शब्द पुनः ऋग्वेदांत आलेला नाहीं, त्यामुळें त्याचा

५. 'तो कोठें आहे' असें ज्या परात्पराविषयीं विचारितात आणि तो नाहींच असें ज्याविषयीं म्हणतात, तो शत्रूचीं धनें, नागविणाऱ्या [द्यूतकारा]प्रमाणें, हरण करितो, त्याजवर तुम्ही भाव ठेवा—तो, हे जन हो, इंद्र [असें समजा].

६. जो श्रीमंताचा चालविणारा, जो दरिद्र्याचा [आणि] जो उपासकाचा [आणि] याचना करणाऱ्या स्तोत्याचा [चालविणारा], जो ग्रावे जोडणाऱ्याचा [आणि] सोम काढणाऱ्याचा शुभानन रक्षिता [होय], तो, हे जन हो, इंद्र [असें समजा].

5. He the sublime one about whom they ask, 'where is he?' and about whom they say, 'he is not,' that one deprives the enemy of the wealth like a deceitful [gambler]. Have ye faith in him. That, o people, is Indra.

6. He who is the mover of the rich, who [is] the [mover] of the poor, who [is the mover] of the worshipper [and] of the prayerful poet, who [is] the ready protector of him that has joined the pressing stones and has extracted the Soma,—that, o people, is Indra.

---

एक लक्ष असा संख्यावाचक अर्थ घेणें योग्य आहे की नाहीं अशी शंका निघते. पण दुसरा कोणताहि अर्थ घेतला तरी येथें जुळेल असा दिसत नाहीं.

---

५. 'ज्याविषयीं कितीएक, तुम्हीं परात्पर इंद्र म्हणतां तो कोठें आहे, असें विचारतात, आणि ज्याविषयीं तो तुमचा इंद्र नाहींच असें दुसरे म्हणतात, आणि असें असतांहि ज्याच्या साह्यानें युद्धांत मोठा जय येऊन शत्रूंची संपत्ति विजयी वीराच्या हातीं येते, तो इंद्र होय, असा विश्वास ठेवा'.

६. 'ग्रावे जोडणाऱ्या' = 'युक्तग्राव्णः'. म्हणजे सोम काढण्यासाठीं जो दगडाचा एक प्रकारचा घाटगा असे तो ज्याणें सिद्ध केला आहे असा, म्हणजे यजमान.

**यस्याश्वा॑सः प्र॒दिशि॒ यस्य॒ गावो॒ यस्य॒ ग्रामा॒ यस्य॒ विश्वे॒ रथा॑सः।**
**यः सूर्यं॒ य उ॒षसं॑ ज॒जान॒ यो अ॒पां ने॒ता स ज॑नास॒ इन्द्रः॑ ॥ ७ ॥**

यस्य॑ । अश्वा॑सः । प्र॒ऽदिशि॑ । यस्य॑ । गावः॑ । यस्य॑ । ग्रामाः॑ । यस्य॑ । विश्वे॑ । रथा॑सः ।
यः । सूर्य॑म् । यः । उ॒षस॑म् । ज॒जान॑ । यः । अ॒पाम् । ने॒ता । सः । ज॒ना॒सः॒ । इन्द्रः॑ ॥ ७ ॥

**यं क्रन्द॑सी सं॒यती॑ वि॒ह्वये॑ते॒ परेऽव॑र उ॒भया॑ अ॒मित्राः॑ ।**
**स॒मा॒नं चि॒द्रथ॑मातस्थि॒वांसा॒ नाना॑ हवेते॒ स ज॑नास॒ इन्द्रः॑ ॥ ८ ॥**

यम् । क्रन्द॑सी॒ इति॑ । सं॒यती॒ इति॑ स॒म्ऽयती॑ । वि॒ह्वये॑ते॒ इति॑ वि॒ऽह्वये॑ते । परे॑ । अव॑रे । उ॒भयाः॑ । अ॒मित्राः॑ ।
स॒मा॒नम् । चि॒त् । रथ॑म् । आ॒त॒स्थि॒ऽवांसा॑ । नाना॑ । ह॒वे॒ते॒ इति॑ । सः । ज॒ना॒सः॒ । इन्द्रः॑ ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. यस्य प्रदिशि ( =अनुशासने ) [ विश्वे ] अश्वासः (=अश्वाः) यस्य [ प्रदिशि ] [ विश्वा ] गावः यस्य [ प्रदिशि ] विश्वे ग्रामाः यस्य [ प्रदिशि ] विश्वे रथासः (=सर्वे रथाः) यः सूर्यं यश् [ च ] उषसं जजान यः अपां नेता (=उदकानां प्रेरकः स्वामी) [ भवति ] स हे जनासः ( =जनाः), इन्द्र [ इति जानीत ] ॥

८. यं क्रन्दसी ( =द्वौ सिंहनादौ ) संयती ( =युद्धार्थं संगच्छमाने सती=युद्धार्थं संगच्छमानाभ्यां सेनाभ्यां कृते ) विह्वयेते ( =विविधं ह्वयतः साहाय्यार्थं ) [ यं ] परे अवरे ( =परपार्श्वस्थाः समीपपार्श्वस्था इति ) उभया अमित्राः ( =उभयविधाः परस्परशत्रव ) [ आह्वयन्ति ] [ यं ] समानं चित् रथम् आतस्थिवांसा ( =एकमेव रथमातस्थिवांसौ=एकमेव मनोरथं धारयन्तौ ) नाना हवेते ( =प्रत्येकं तस्यैकस्यैव मनोरथस्य पूरणार्थं पृथगाह्वयतः)– स हे जनासः (=जनाः), इन्द्र [इति जानीत]॥

७. ज्याच्या आज्ञेत [ सर्व ] अश्व, ज्याच्या [ आज्ञेत ] [सर्व ] गाई, ज्याच्या [आज्ञेत सर्व] ग्राम, ज्याच्या [ आज्ञेत ] सर्व रथ, जो सूर्याला [ आणि ] जो उषेला उत्पन्न करिता झाला, जो उदकांचा नायक, तो हे जन हो, इंद्र [ असें समजा ].

८. ज्याला सिंहनाद करणाऱ्या [ आणि ] परस्पर भिडणाऱ्या उभय सेना हाका मारितात, पलीकडचे [ आणि ] आलीकडचे असे उभय शत्रु [ हाका मारितात ], [ज्याला] एकाच रथावर बसलेले दोघेजण आपआपल्या बाजूला बोलावितात, तो हे जन हो, इंद्र [असें समजा ].

7. He at whose command [ are ] [ all ] horses, at whose [ command] [are] [ all ] cows, at whose [command] [are] [all] villages, at whose [command] [are] all chariots, he who created the sun, he who [created] the dawn, who [is] the master of the waters—that, o people, is Indra.

8. He whom both the war-cries, joining battle, each invoke for help; [ whom ] both enemies, those there and these here, [ each invoke for help ]; [ whom ] two persons aiming at the same object call to help from different sides,—that, o people, is Indra.

---

७. 'उदकांचा नायक' = 'अपां नेता.' म्हणजे उदकें ज्याच्या आज्ञेत आहेत तो.

८. 'परस्परांवर जय मिळावा म्हणून एकमेकांशीं लढणाऱ्या सेनांचे जे सिंहनाद अथवा जयशब्द 'जय जय इंद्र इ०,' त्यांहींकरून जो बोलाविला जाणारा, ज्याला परस्परांचे शत्रु आपआपल्या जयासाठीं बोलावितात, तो इंद्र होय.'

या ऋचेंत क्रंदस् आणि संयत् हे नपुंसक शब्द किंचित् कठिण आहेत आणि 'रथ' शब्दाचा अर्थ मनोरथ असा करावा लागतो, याशिवाय यांत कांहीं कठिण नाहीं. आम्हीं मराठी भाषांतर केवळ अक्षरास न अनुसरतां अभिप्रायास अनुसरून केलें आहे.

'पलीकडचे आणि आलीकडचे' = 'परे अवरे'. म्हणजे लढाईंत समोरासमोर उभे राहिलेले.

'एकाच रथावर बसलेले' = 'समानं रथम् आतस्थिवांसा.' म्ह. एकच मनोरथ धारण करणारे.

यस्मान्न ऋते विजयन्ते जनासो यं युध्यमाना अवसे हवन्ते ।
यो विश्वस्य प्रतिमानं बभूव यो अच्युतच्युत्स जनास इन्द्रः ॥९॥

यस्मात् । न । ऋते । विऽजयन्ते । जनासः । यम् । युध्यमानाः । अवसे । हवन्ते ।
यः । विश्वस्य । प्रतिऽमानम् । बभूव । यः । अच्युतऽच्युत् । सः । जनासः । इन्द्रः ॥ ९ ॥

यः शश्वतो मह्येनो दधानानमन्यमानाञ्छर्वा जघान ।
यः शर्धते नानुददाति शृध्यां यो दस्योर्हन्ता स जनास इन्द्रः ॥ १० ॥ ८ ॥

यः । शश्वतः । महि । एनः । दधानान् । अमन्यमानान् । शर्वा । जघान ।
यः । शर्धते । न । अनुऽददाति । शृध्याम् । यः । दस्योः । हन्ता । सः । जनासः । इन्द्रः ॥ १० ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

९. यस्मादृते जनासः (=जना) न विजयन्ते (=विजयं न प्राप्नुवन्ति) यं युध्यमानाः (=युद्धं कुर्वाणा जना) अवसे हवन्ते (=रक्षणाय आह्वयन्ति) यो विश्वस्य (=सर्वस्य जगतः) प्रतिमानं (=मानं) बभूव यः अच्युतच्युत् (=अच्युतानां क्षयरहितानां पर्वतादीनामपि च्यावयिता) [भवति] स हे जनासः (=जनाः), इन्द्र [इति जानीत] ॥

१०. यो महि एनो दधानान् (=महत् पापं विदधानान् कुर्वाणान्) अमन्यमानान् (=इन्द्रमपूजयतः) शश्वतः (=बहून् क्रमेण) शर्वा जघान (=वज्रेण हतवान्) यः शर्धते (=बलं कुर्वते=बलवानस्मीति गर्वं कुर्वते) शृध्यां (=बलं) नानुददाति (=आनुकूल्येन न ददाति) यश्च [च] दस्योर्हन्ता (=शत्रोर्घातको) [भवति] स हे जनासः (=जनाः), इन्द्र [इति जानीत] ॥

९. ज्याच्या शिवाय लोकांला जय मिळत नाहीं, ज्याला [लोक] युद्ध करीत असतांना रक्षणासाठीं बोलावितात, जो सकळ विश्वाचें प्रतिमान झाला आहे, जो अचलांलाहि हालविणारा, तो हे जन हो, इंद्र [ असें समजा ].

१०. जो मोठें पाप करणारे [ आणि ] उपासना न करणारे बहुत जन यांस वज्रानें सतत मारिता झाला, जो बळाचा डौल घालणाऱ्या [ अनुपासका]ला बळ देत नाहीं, जो दस्यूला मारणारा, तो हे जन हो, इंद्र [असें समजा].

9. He without whom people do not conquer, whom those that are fighting invoke for help, who has become the standard of all, who is the shaker of that which is unshakable,— that, o people, is Indra.

10. He who killed with the thunderbolt one after another many who committed sin [ and ] who made no worship, who gives no strength to him that boasts his strength, who is the killer of the enemy—that, o people, is Indra.

९. 'प्रतिमान' सू. ५२मं. १३ याजवरील टीप पहा.

१०. ' दस्यूला मारणारा' =' दस्योर्हन्ता.' म्हणजे अनार्य जातीचा जो शत्रु त्याला नाहींसा करणारा.

यः शम्बरं पर्वतेषु क्षियन्तं चत्वारिंश्यां शरद्यन्वविन्दत् ।
ओजायमानं यो अहिं जघान दानुं शयानं स जनास इन्द्रः ॥ ११ ॥

यः । शम्बरम् । पर्वतेषु । क्षियन्तम् । चत्वारिंश्याम् । शरदि । अनुऽअविन्दत् ।
ओजायमानम् । यः । अहिम् । जघान । दानुम् । शयानम् । सः । जनासः । इन्द्रः ॥ ११ ॥

यः सप्तरश्मिर्वृषभस्तुविष्मानवासृजत्सर्तवे सप्त सिन्धून् ।
यो रौहिणमस्फुरद्वज्रबाहुर्द्यामारोहन्तं स जनास इन्द्रः ॥ १२ ॥

यः । सप्तऽरश्मिः । वृषभः । तुविष्मान् । अवऽअसृजत् । सर्तवे । सप्त । सिन्धून् ।
यः । रौहिणम् । अस्फुरत् । वज्रऽबाहुः । द्याम् । आऽरोहन्तम् । सः । जनासः । इन्द्रः ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

११. यः पर्वतेषु क्षियन्तम् (=इन्द्रभिया बहून् संवत्सरान् प्रच्छन्नो भूत्वा पर्वतगुहासु निवसन्तं) शम्बरम् (=एतन्नामानमसुरं) चत्वारिंश्यां शरदि (=चत्वारिंशे वर्षे) अन्वविन्दत् (=अन्विष्यालभत) यश् [च] ओजायमानं (=बलमाचरन्तम्) अहिं दानुम् (=असुरं) शयानं (=शयनं कुर्वन्तं) जघान (=हतवान्) स हे जनासः (=हे जनाः), इन्द्र [इति जानीत] ॥

१२. सप्तरश्मिः (="सप्तसंख्याकाः पर्जन्या रश्मयो यस्य" सः) वृषभः (=वीरस्) तुविष्मान् (=बलवान्) यः सप्त सिन्धून् (=मेघोदकरूपा नदीः) सर्तवे अवासृजत् (=सर्तुमवासृजत्=अवसृज्याप्रवाहयत्), वज्रबाहुः (=वज्रं बाह्वोर्गृहीत्वा) रौहिणं [नामासुरं] द्याम् आरोहन्तं [सन्तम्] अस्फुरत् (=अहन्) स हे जनासः (=हे जनाः) इन्द्र [इति जानीत] ॥

सप्तरश्मिः सप्तसंख्याकाः पर्जन्या रश्मयो यस्य । ते च रश्मयो वराहवः स्वतपसो विद्युन्महसो धूपयः श्वापयो गृहमेधाश्चेत्येते ये च मेऽशिमिविद्विषः पर्जन्याः सप्त पृथिवीमभिवर्षन्ति वृष्टिभिरिति तैत्तिरीयारण्यके ह्याम्नाताः । इति सायणः ॥

११. जो पर्वतांत वास करणाऱ्या शंबराला चाळिसाव्या वर्षी शोधून काढिता झाला, [ आणि ] जो बळाचा डौल घालणाऱ्या असुर अहीला पडून राहिला असतां मारिता झाला— तो हे जन हो, इंद्र [ असें समजा ].

११. He who found, out in the fortieth year Śambara that dwelt in the mountains, [and] who killed the demon serpent that was lying down [and] that made an effort to show his strength—that, o people, is Indra.

१२. जो सप्तरश्मि, बळवान्, प्रतापी [ होत्साता ] सप्त सिन्धूंला सोडून देऊन वाहविता झाला, जो द्युलोकावर चढणाऱ्या रौहिणाला हातांत वज्र घेऊन मारून टाकिता झाला, तो हे जन हो, इंद्र [ असें समजा ].

12. He who, being seven-rayed, the powerful Lord, let down the seven rivers to flow, [and] who with the thunderbolt in his hands, slew Rauhiṇa ascending heaven—that, o people, is Indra.

---

११. 'शंबर'. सू.५१ मं.६ आणि टीप पहा. येथें 'अहि' आणि 'दानु' (असुर) हीं पदेंहि शंबरालाच लाविलीं आहेत असें दिसतें.

१२. ' सप्तरश्मि ' म्हणजे सायणांनीं अर्थ काय केला आहे तो भाषेखालीं पहा. वस्तुतः सात लगाम हातांत घेऊन रथ हाकणारा असा अर्थ दिसतो. रथाला सप्तरश्मि असें म्हटलेलीं स्थळें पुष्कळ आहेत आणि तेथें तर सात लगाम असलेला हा अर्थ उघड आहे.

' सप्त सिंधूंला ' म्हणजे मेघोदकरूप नद्यांला. सू. ३५ मं. ८ आणि टीप पहा.

'रौहिण' सू. १०३ मं. २ आणि टीप पहा.

द्यावा चिदस्मै पृथिवी नमेते शुष्मांच्चिदस्य पर्वता भयन्ते ।
यः सोमपा निचितो वज्रबाहुर्यो वज्रहस्तः स जनास इन्द्रः॥१३॥

द्यावा । चित् । अस्मै । पृथिवी इति । नमेते इति । शुष्मात् । चित् । अस्य । पर्वताः । भयन्ते ।
यः । सोमऽपाः । निऽचितः । वज्रऽबाहुः । यः । वज्रऽहस्तः । सः । जनासः । इन्द्रः ॥ १३ ॥

यः सुन्वन्तमवति यः पचन्तं यः शंसन्तं यः शशमानमूती ।
यस्य ब्रह्म वर्धनं यस्य सोमो यस्येदं राधः स जनास इन्द्रः॥१४॥

यः । सुन्वन्तम् । अवति । यः । पचन्तम् । यः । शंसन्तम् । यः । शशमानम् । ऊती ।
यस्य । ब्रह्म । वर्धनम् । यस्य । सोमः । यस्य । इदम् । राधः । सः । जनासः । इन्द्रः ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१३. अस्मै द्यावा पृथिवी चित् ( =द्यावापृथिव्यावपि ) नमेते ( =स्वयमेव प्रह्वी-भवतः) । अस्य शुष्मात् (=बलात्) पर्वताश्चित् (=पर्वता अपि) भयन्ते (=बिभ्यति) । यः सोमपाः ( =सोमस्य पाता ) निचितः ( =दृढाङ्गो ) वज्रबाहुः ( =वज्रो बाहौ यस्य स ) यो वज्रहस्तः (=वज्रो हस्ते यस्य स )- स हे जनासः ( =जनाः), इन्द्र [इति जानीत ] ॥

१४. यः सुन्वन्तं ( =सोमम् अभिषुण्वन्तं ) यो [ हविः] पचन्तं यः शंसन्तं ( =शस्त्राण्युच्चारयन्तं ) यः शशमानं (=स्तोत्रं कुर्वाणम्) ऊती ( =साहाय्येन ) अवति ( =रक्षति ) यस्य ब्रह्म ( =स्तोत्रं ) वर्धनं ( =वृद्धिकरं ) [ भवति ] यस्य सोमो यस्य [ च ] इदं राधः ( =अस्मदीयं पुरोडाशादिलक्षणम् अन्नं ) [ वृद्धिकरं भवति ] स हे जनासः ( =जनाः ), इन्द्र [ इति जानीत ] ॥

१३. द्यू आणि पृथिवी सुद्धा ह्याला नमन करितात, ह्याच्या प्रतापाला पर्वत सुद्धा भितात. जो सोमपान करणारा, बळकट, वज्रबाहु, ज्याच्या हातांत वज्र आहे, तो हे जन हो, इंद्र [असें समजा].

१४. जो सोम काढणाऱ्याला रक्षितो, जो [हवि] शिजविणाऱ्याला, जो रक्षण करण्याविषयीं प्रार्थना करणाऱ्याला, जो स्तोत्र करणाऱ्याला, कृपेनें [ रक्षितो ], ज्याला स्तोत्र वृद्धिकर होतें, ज्याला सोम [ वृद्धिकर होतो ], ज्याला हें हविरन्न [ वृद्धिकर होतें ], तो हे जन हो, इंद्र [ असें समजा ].

13. To him even heaven and earth bend themselves. Even the mountains tremble before his might. He who is a drinker of the Soma, mighty, wielder of the thunderbolt, who is armed with the thunderbolt—that, o people, is Indra.

14. He who protects the extractor of [ Soma ], who [ protects ] him who cooks the [ oblation ], who [ protects ] the prayerful, who [ protects ] with his help the poet that praises him, to whom a hymn brings strength, to whom the Soma [ and ] to whom this sacrificial food brings strength—that, o people, is Indra.

---

१३. 'जो सोमपान करणारा'=' सोमपाः'. सोमपानानें बळ अतिशय वाढत असतें म्हणून सोमपा म्ह. अतिशय बळवान् असा अर्थ येथें समजायाचा आहे.

१४. ' स्तोत्र वृद्धिकर होतें'=' ब्रह्म वर्धनम्.' स्तोत्र, सोम हविरन्न इत्यादि ज्याला अर्पण केलें असेल तो देव बळवान् होतो, असें ऋग्वेदांत जिकडे तिकडे आढळतें.

**यः सुन्वते पचते दुध्र आ चिद्वाजं दर्दर्षि स किलासि सत्यः ।**
**वयं त इन्द्र विश्वह प्रियासः सुवीरासो विदथमा वदेम॥१५॥९॥**

यः । सुन्वते । पचते । दुध्रः । आ । चित् । वाजम् । दर्दर्षि । सः । किल । असि । सत्यः ।
वयम् । ते । इन्द्र । विश्वह । प्रियासः । सुऽवीरासः । विदथम् । आ । वदेम ॥ १५ ॥ ९ ॥

## भाषायाम्.

१५. [ हे इन्द्र ], दुध्रः ( =दुर्धरो ) यः सुन्वते पचते आ चित् ( =सोमम् अभिषुण्वत एव हविरन्नं च पचत एव जनाय ) वाजं दर्दर्षि ( =बलम् अतिशयेन ददासि ) स [ त्वं ] किल सत्योसि ( =यथा त्वमसीति जना आहुस्तथा सत्यमेव विद्यसे ) । [ तस्मात् ] हे इन्द्र, ते प्रियासः ( =तुभ्यं प्रीतिकरा ) वयं सुवीरासः (=कल्याणपुत्रपौत्राः सन्तो ) विश्वह ( =सर्वेष्वहःसु ) विदथम् आ वदेम ( =स्तोत्रं ब्रूयाम ) ॥

---

## सूक्तम् १३—२०४.

गृत्समद ऋषिः । इन्द्रो देवता । अन्त्या त्रिष्टुप् । शिष्टं सूक्तं जागतम् ॥

**ऋतुर्जनित्री तस्या अपस्परि मक्षू जात आविशद्यासु वर्धते ।**
**तदाहना अभवत्पिप्युषी पयोऽंशोः पीयूषं प्रथमं तदुक्थ्यम् ॥१॥**

ऋतुः । जनित्री । तस्याः । अपः । परि । मक्षु । जातः । आ । अविशत् । यासु । वर्धते ।
तत् । आहनाः । अभवत् । पिप्युषी । पयः । अंशोः । पीयूषम् । प्रथमम् । तत् । उक्थ्यम् ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. ऋतुः ( =वर्षाख्यः कालः ) [ सोमस्य ] जनित्री (=जनयित्री ) [ भवति ] । तस्याः परि जातः ( =तस्याः सकाशाज्जातो ) मक्षु ( =क्षिप्रम् ) अप आ अविशत् ( =उदकानि प्राविशत् ) यासु [ अप्सु ] [ स सोमो ] वर्धते । तत् (=ततः) पयः पि-

१५. [ हे इन्द्रा ], दुर्धर हो- त्साता जो तूं सोम काढणाऱ्यालाच आणि [ हविरन्न ] शिजविणाऱ्या- लाच बळाढ्य करितोस, तो तूं आ- हेस खरा यांत संशय नाहीं. हे इंद्रा, तुला प्रिय होत्साते आम्ही शूर पुत्रपौत्रांसहित नित्य स्तोत्र म्हणूं असें कर.

15. Thou who being irresistible grantest strength in plenty to him alone who extracts [ the Soma ] and to him alone who cooks [the oblation], dost doubtless exist. May we, O Indra, dear to thee daily sing the hymn, accompanied by brave progeny.

---

१५. उपसंहार. 'इंद्र आहे याची प्र तीति सोम काढून अर्पणाऱ्या आणि हवि शिजवून घालणाऱ्या उपासकांला येते त्या- पेक्षां निदान आम्हांस तरी तुझ्या अ- स्तित्वाविषयीं संशय नाहीं; त्यापेक्षां हे इंद्रा, आम्हीं तुला प्रिय व्हावें आणि तुझ्या प्रसादानें आमच्या पोटीं शूर पुत्र- पौत्र उपजावे आणि त्यांसहित, तुझी आम्ही स्तुति गावी असें कर.' असें तात्पर्य.

---

## सूक्त १३–२०४.

ऋषि–गृत्समद. देवता–इन्द्र. वृत्त–तेरावी ऋचा त्रिष्टुभ्; शिवाय सर्व सूक्त जगती वृत्ताचें.

## Hymn. 13—204.

To *Indra*. By *Gṛitsamada*. Metre —*Jagatî*, except in the last verse where it is *Trishṭubh*.

१. ऋतु आई [ होय ]. ति- जपासून जन्मतांच तो एकदम उ- दकांत प्रवेश करिता झाला, कीं ज्यांत तो वाढतो. त्यावरून जिणें रसाला पुष्ट केलें आहे अशी ती [ सोमलता ] सोमरस काढण्या- साठीं कुटावयास योग्य झाली. सोमलतेचा तो उत्कृष्ट रस वाखा- णण्यास योग्य [ होय ]

1. The season [ is its ] mother. So soon as it was born to her it entered the waters in which it grows. Then having fattened the juice [the plant] became fit to be crushed. That first juice of the Soma-plant [ is ] praiseworthy.

**स॒ध्रीमा य॑न्ति॒ परि॒ बिभ्र॑ती॒: पयो॑ वि॒श्वप्स्न्या॑य॒ प्र भ॑रन्त॒ भोज॑नम् ।**
**स॒मा॒नो अध्वा॑ प्र॒वता॑मनु॒ष्यदे॒ यस्ताकृ॑णोः प्रथ॒मं सास्यु॒क्थ्य॑:॥२॥**

स॒ध्री । ई॒म् । आ । य॒न्ति॒ । परि॑ । बिभ्र॑तीः । पय॑: । वि॒श्वऽप्स्न्या॑य । प्र । भ॒र॒न्त॒ । भोज॑नम् ।

स॒मा॒नः । अध्वा॑ । प्र॒ऽवता॑म् । अ॒नु॒ऽस्यदे॑ । यः । ता । अकृ॑णोः । प्र॒थ॒मम् । सः । अ॒सि॒ । उ॒क्थ्य॑: ॥ २ ॥

---

प्युषी (=रसं वर्धितवती) [सोमौषधी] आहना अभवत् (=अभिषोतव्याभवत्) । अंशोस्तन् प्रथमं पीयूषं (=सोमलतायाः स प्रथमो रस) उक्थ्यं (=स्तवनीयं) [भवति]॥

दुर्बोधकल्पैषा सायणेनैवं व्याख्याता । ऋतुर्वर्षाख्यः कालो जनित्री सोमस्य जनयित्री जननी भवति । तस्याः परि तस्या जनन्याः सकाशाज्जातः सोमोऽप उदकानि मक्षु शीघ्रमाविशत् । यास्वप्सु सोमो वर्धते ता अविशदित्यन्वयः । तस्मादप्सु प्रविष्टत्वात् सोम आहना आहन्तव्योऽभिषोतव्यो भवति । आहना इति सकारान्तमिदं पदम् । तथा च मन्त्रवर्णः । ये ते मदा आहनसो विहायस इति । या चांशुरूपा सोमलता पयः सारभूतं पिप्युषी वर्धयन्त्यभवत् । ...... अंशोस्तस्याः सोमलतायाः पीयूषं रसभूतं पय उक्थ्यं प्रशस्यं हविरिन्द्रस्य भवति । इति ॥

---

## भाषायाम्.

२. पयः परि बिभ्रतीः (=परितः सर्वत उदकम् आनयन्त्यो) [१ नद्यः] सध्री (=सह) ईम् आ यन्ति (=तं वक्ष्यमाणं समुद्रं सर्वतो गच्छन्ति) [ता] विश्वप्स्न्याय (=१ विश्वासाम् अपाम् आश्रयभूताय समुद्राय) भोजनं प्र भरन्त (=पयोरूपम् अन्नं प्रकर्षेण संपादयन्ति) प्रवतां (=निम्नगानाम्) अनुष्यदे (=अनुष्यन्दनाय) समानो अध्वा (=एक एव मार्गो) [भवति] । यस्ता (=तानि=एतानि वीरकर्माणि) प्रथमम् अकृणोः (=अकरोः) स [त्वम्] उक्थ्योसि (=प्रशस्यो भवसि)॥

अनेका नद्यः सर्वत उदकं बिभ्रत्यः समुद्रमेकं प्रति गच्छन्ति इत्येतद् वीरकर्म यस्मात्त्वमकरोस्तस्मात्त्वं प्रशस्यो भवसीति भावः ॥

---

१. ह्या ऋचेंत सोमाविषयीं सांगितलें आहे. पण ऋचा कांहींशी दुर्बोध आहे. सायणांनीं सांगितल्या अर्थाप्रमाणें तात्पर्य असें दिसतें कीं, 'ज्या ऋतूंत (म्हणजे पावसाळ्यांत) सोमवल्ली तयार होते तो ऋतु सोमाची आई आहे. तो उत्पन्न होतांच वल्लीच्या आंगांत असलेल्या पाण्यांत शिरतो. नंतर तें सोमयुक्त जें आंगचें

२. चोहींकडून पाणी आणणाऱ्या ज्या त्या एकदम त्या [समुद्रा]प्रत जातात, सर्वाश्रय [समुद्रा]प्रत भोजन घेऊन जातात. प्रवाहांला वाहण्याकरितां एकच मार्ग [आहे]. हें सर्व जो तूं प्रथम करिता झालास, तो तूं स्तुत्य आहेस.

2. Carrying water from all sides they run to it (the sea) simultaneously—they carry food for the Shelter of All. Common is the road of the streams to glide along. Thou who didst these things first art deserving of praise.

---

पाणी तें पुष्ट झालें म्हणजे वल्ली सोमरस काढून घेण्याजोगी होते. तेव्हां ती वल्ली पिळल्यानंतर जो सोमरस निघतो तो उत्तम असतो.'

---

२. या सूक्तांतील इतर ऋचांप्रमाणें हीहि कठिण आहे. सायणांनीं केलेल्या अर्थाप्रमाणें भावार्थ असा आहे कीं, 'सर्व बाजूंनीं पाणी वाहून आणणाऱ्या नद्या एकट्या समुद्राप्रत ज्या तुझ्या पराक्रमानें एका हेतूनें जात असतात, तो तूं स्तवनीय आहेस.'

असा भावार्थ दिसतो तरी त्याचा खरेपणा 'विश्वप्स्न्य' या शब्दाचा अर्थ समुद्र असा होईल किंवा नाहीं या संशयावर अवलंबून आहे.

अन्वेको वदति यद्ददाति तद्रूपा मिनन्तदपा एक ईयते ।
विश्वा एकस्य विनुदस्तितिक्षते यस्ताकृणोः प्रथमं सास्युक्थ्यः॥३॥
अनु । एकः । वदति । यत् । ददाति । तत् । रूपा । मिनन् । तत्ऽअपाः । एकः । ईयते ।
विश्वाः । एकस्य । विऽनुदः । तितिक्षते । यः । ता । अकृणोः । प्रथमम् । सः । असि । उक्थ्यः ॥ ३ ॥
प्रजाभ्यः पुष्टिं विभजन्त आसते रयिमिव पृष्ठं प्रभवन्तमायते ।
असिन्वन्दंष्ट्रैः पितुरत्ति भोजनं यस्ताकृणोः प्रथमं सास्युक्थ्यः॥४॥
प्रऽजाभ्यः । पुष्टिम् । विऽभजन्तः । आसते । रयिम्ऽइव । पृष्ठम् । प्रऽभवन्तम् । आऽयते ।
असिन्वन् । दंष्ट्रैः । पितुः । अत्ति । भोजनम् । यः । ता । अकृणोः । प्रथमम् । सः । असि । उक्थ्यः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. एको यद् ददाति तद् अनुवदति । रूपा मिनन् (=रूपाणि हिंसन्) एकस् तदपाः (=रूपहिंसनं कर्म यस्य स एक) ईयते (=इतस्ततो गच्छति)। एकस्य विश्वा विनुदः (=सर्वान् विक्षेपान्) तितिक्षते (=सहते)। यस्ता प्रथमम् अकृणोः (=अकरोः) स [त्वम्] उक्थ्योसि (=प्रशस्यो भवसि)॥

इत्यक्षरार्थः। सायणस्तु दुर्बोधामिमामेवं व्याचष्टे। यजमानो यद्धविर्देवेभ्यो ददाति तदेको होतानुवदति। याज्यापुरोनुवाक्याभ्यां देवताः स्मारयति। एकोऽध्वर्यू रूपा पश्वादीनां रूपाणि मिनन् हिंसन् तद्रूपास्तद्विशसनाख्यमपः कर्म यस्य तादृशः सन् ईयते। देवयजने सर्वत्र गच्छति। एकस्याध्वर्योर्विश्वा विनुदः सर्वाणि तत्कर्तृकाणि विक्षेपणरूपाणि कर्मवैगुण्यानि तितिक्षते। तद्योग्यप्रायश्चित्तकरणेन ब्रह्मा सहते।...... तानि हविःप्रदानादीनि कर्माणि यस्त्वमकृणोः। अकारयः स त्वमुक्थ्योऽसि। इति ॥

४. आयते (=आगच्छते=अतिथये) पृष्ठं प्रभवन्तं रयिम् इव (=यथा तस्मै "धारकं" "बहुभरणसमर्थं" च धनं ददति तद्वत्) प्रजाभ्यः (=जनेभ्यः) पुष्टिं विभजन्तः (=पोषकं धनं प्रयच्छन्त) आसते (=निवसन्ति)। दंष्ट्रैरसिन्वन् (=द-

३. एक जें देतो त्याजबरोबर तो बोलतो. रूपनाश करणें हें ज्याचें काम आहे असा एकजण तें काम करीत इकडे तिकडे फिरतो. एकाचे सर्व मार सहन करितो. हें सर्व जो तूं प्रथम करिता झालास, तो तूं स्तुत्य आहेस.

४. अतिथीला धारक [आणि] बहुभरणसमर्थ धन दिल्याप्रमाणें प्रजांला संपृक्ति देत बसतात. दांतांनीं चावल्याशिवाय बापाचें अन्न खातो. हें सर्व जो तूं प्रथम करिता झालास, तो तूं स्तुत्य आहेस.

3. One speaks along with that which he gives. One goes about destroying forms, he whose business it is to do so. [He] bears all the blows of one. Thou who didst these things first art deserving of praise.

4. They sit distributing food to people like giving to a guest wealth that is sustaining and full of nourishing plenty. He swallows the food of [his] father without grinding it with his teeth. Thou who didst these things first art deserving of praise.

---

३. ही ऋचा सुद्धा कठिण आहे. अक्षरार्थ बराच सोपा आहे, तो दिला आहे. पण 'एक' 'एक' जो सांगितला आहे तो कोण हें गूढ आहे. पहिल्या तीन पादांतून प्रत्येक पादांत कांहीएक मोठ्या सृष्टिकार्याविषयीं अथवा अति बलवान् पदार्थाविषयीं सांगितलें आहे असें दिसतें. कदाचित् भावार्थ असा असेल काय? 'मेघ पाणी देतो त्याजबरोबर तो गर्जना करितो. सविता सर्व प्राण्यांस म्हातारे करीत करीत सदैव चालत असतो. इंद्र एकटाच वृत्राचे प्रहार सहन करीत असतो. हें सर्व इंद्राच्या प्रतापामुळें होतें. तर त्याकरितां तो स्तुत्य आहे.'

'विद्रुद्' शब्द दुसरे ठिकाणीं कोठें आलेला नाहीं.

४. ही ऋचा तरी कठिणच आहे. 'वसतात' आणि 'खातो' यांचे कर्ते कोण तें समजत नाहीं. ज्याप्रमाणें पूर्वीच्या ऋचेंत 'एक' सांगितला आहे तो कोण हें समजत नाहीं, तसाच यांतील क्रियापदाचाहि कर्ता कोण आहे हें गूढ आहे. त्या पूर्वीच्या (दुसऱ्या) ऋचेंतहि पहिल्या तीन पादांत कर्ता कोण आहे हें गूढ आहे. ऋषीनें उखाण्यासारिखा अर्थ जाणविलेला दिसतो. तेव्हां अर्थ उघड न समजणें यांत नवल नाहीं.

आम्ही अर्थ पदशः केला आहे. आणि सायणाची व्याख्या भाषेखालीं उतरून घेतली आहे.

**अधाकृणोः पृथिवीं संदृशे दिवे यो धौतीनामहिहन्नारिणक्पथः ।
तं त्वा स्तोमेभिरुदभिर्न वाजिनं देवं देवा अजनन्त्सास्युक्थ्यः
॥ ५ ॥ १० ॥**

अध । अकृणोः । पृथिवीम् । सम्ऽदृशे । दिवे । यः । धौतीनाम् । अहिऽहन् । अरिणक् । पथः ।
तम् । त्वा । स्तोमेभिः । उदऽभिः । न । वाजिनम् । देवम् । देवाः । अजनन् । सः । असि । उक्थ्यः ॥ ५ ॥ १० ॥

---

न्तैरसंखादन्=चर्वणमकृत्वैव ) पितुर्भोजनमत्ति (=पितुरन्नं भक्षयति) । यस्ता प्रथममकृणोः (=अकरोः) स [ त्वम् ] । उक्थ्योसि ( =प्रशस्यो भवसि ) ॥

इत्यक्षरार्थः । अभिप्रायस्तु दुर्बोधः । सायण एवं व्याचष्टे । हे इन्द्र पुष्टिं त्वया दत्तं पोषकं धनं स्वकीयाभ्यः प्रजाभ्यो विभजन्तोऽस्मैतावदस्मैतावदिति विभागं कुर्वन्तो गृहमेधिन आसते । स्वस्वगृहेषु निवसन्ति । तत्र दृष्टान्तः । आयते गृहं प्रत्यागच्छतेऽतिथये पृष्टं भारकं प्रभवन्तं बहुभरणसमर्थं रयिं धनं यथा विभज्य प्रयच्छन्ति तद्वत् । असिन्वन् सेतुबन्धादिकं कर्म कुर्वन् लोकः पितुः पालयित्र्या दिवः सकाशादागतं भोजनमुदकं तत्कार्या ओषधीर्दंष्ट्रैर्दन्तैरत्ति । भक्षयति । ...अ असिन्वन् अव्याप्रियमाणोऽग्निः पितुः पालकस्य यजमानस्य संबन्धि भोजनं हविर्लक्षणमन्नं दंष्ट्रैर्दन्तरूपैर्ज्वालैरत्ति । यस्ताकृणोरित्यादि सिद्धम् । इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

५. अध ( =अपि च ) पृथिवीं दिवे संदृशे अकृणोः ( =पृथिवी द्युसदृशी यथा दृश्येत तथाकरोः =ज्योतिर्दानेन पृथिवीं सुदर्शनाम् अकरोः ) । हे अहिहन् ( =वृत्रस्य हन्तरिन्द्र ), यस् [ त्वं ] धौतीनां ( =नदीनां मेघोदकलक्षणानां ) पथः अरिणक् ( =अरेचयः=वृत्रहननेन गन्तुं योग्यानकरोत् ) तं त्वा देवाः ( =? ) उदभिर्वाजिनं न ( =उदकैरश्वमिव ) स्तोमेभिः ( =स्तोत्रैः ) अजनन् (=अजनयन्) । स [ त्वम् ] उक्थ्योसि ( =प्रशस्यो भवसि ) ॥

देवाः स्तोतारस्तं तादृशं देवं त्वां स्तोमेभिः स्तोत्रैरजनन् । तत्र दृष्टान्तः । उदभिर्न वाजिनम् । यथा वाजिनमश्वमुदभिरुदकैर्वर्धयन्ति तद्वत् । इति सायणः ॥

५. आणि तूं पृथिवी द्यू सारिखी दिसे असें करिता झालास. हे अहिघातका, जो तूं नद्यांचे मार्ग मोकळे करिता झालास त्या तुज देवाला, उदकांनीं अश्वाला उत्पन्न केल्याप्रमाणें, देव स्तोत्रांनीं उत्पन्न करिते झाले. तो तूं स्तुत्य आहेस.

5. And thou didst make the earth look like the heaven, thou, o killer of the serpent, who didst free the channels of the rivers. The gods begot thee with hymns even as a horse with the waters. Thou art therefore deserving of praise.

---

५. हाहि मंत्र कठिण आहे परंतु दुसऱ्या पादांतील उपमा खेरीज करून एकंदर भावार्थ सोपा आहे. 'ज्या इंद्रानें वृत्रहनन करून द्यूचा प्रकाश पृथिवीवर पाडिला, आणि अंतरिक्षांतील उदकें खालीं वाहविलीं, तो इंद्र स्तुतिपात्र आहे,' असें तात्पर्य.

देव उत्पन्न करिते झाले म्हणजे 'स्तोते उत्पन्न करिते झाले' असें सायण म्हणतात, आणि उत्पन्न करिते झाले. म्हणजे स्तोत्रांनीं वाढविते झाले असें म्हणतात.

यो भोजनं च दयसे च वर्धनमार्द्रादा शुष्कं मधुमद्दुदोहिथ ।
स शेवधिं नि दधिषे विवस्वति विश्वस्यैक ईशिषे सास्युक्थ्यः ॥६॥

यः । भोजनम् । च । दयसे । च । वर्धनम् । आर्द्रात् । आ । शुष्कम् । मधुऽमत् । दुदोहिथ ।
सः । शेवऽधिम् । नि । दधिषे । विवस्वति । विश्वस्य । एकः । ईशिषे । सः । असि । उक्थ्यः ॥ ६ ॥

यः पुष्पिणीश्च प्रस्वश्च धर्मणाधि दाने व्य१वनीरधारयः ।
यश्चासमा अजनो दिद्युतो दिव उरुरूर्वाँ अभितः सास्युक्थ्यः ॥७॥

यः । पुष्पिणीः । च । प्रऽस्वः । च । धर्मणा । अधि । दाने । वि । अवनीः । अधारयः ।
यः । च । असमाः । अजनः । दिद्युतः । दिवः । उरुः । ऊर्वान् । अभितः । सः । असि । उक्थ्यः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

६. यस् [ त्वं ] भोजनं च वर्धनं च दयसे ( =अन्नं च वृद्धिं च ददासि ) [अपि च ] आर्द्रात् आ [ काण्डात् ] शुष्कं मधुमत् ( =अनार्द्रं माधुर्योपेतं व्रीह्यादिकं ) दुदोहिथ ( =दुग्धवानसि ) स [ त्वं ] विवस्वति ( =परिचरणवत्युपासके शेवधिं नि दधिषे ( =धननिधिं स्थापयसि ) । एकस् [ त्वं ] विश्वस्य ( =सर्वस्य जगत ) ईशिषे ( =स्वामी भवसि ) । स [ त्वम् ] उक्थ्योसि ( =प्रशस्यो भवसि ) ॥

७. यः पुष्पिणीश्च प्रस्वश्च ( =पुष्पवतीः फलवतीश्च ) अवनीः ( =ओषधीर् ) धर्मणा ( =ऐश्वर्यकर्मणा ) दाने ( =क्षेत्रे ) व्यधारयः ( =विविधम् अस्थापयः ) यश्च दिवः ( =द्युलोकस्य ) असमा दिद्युतः ( =अद्वितीया विद्युतः ) अजनः ( =अजनयः ) [ यश्च ] उरुः ( =विस्तीर्णः सन् ) ऊर्वान् ( =उदकनिकायान्=समुद्रान् ) अभितः ( =सर्वतः ) [ अजनयः ] स [ त्वम् ] उक्थ्योसि ( =प्रशस्यो भवसि ) ॥

६. जो तूं अन्न देतोस आणि वृद्धि [ देतोस ] आणि ओल्यापासून सुकें आणि गोड दोहतोस, तो तूं उपासकाच्या घरीं संपत्ति ठेवितोस. तूं एकला सर्वांचा स्वामी आहेस. तो तूं स्तुत्य आहेस.

6. Thou who givest both food and growth, and milkest that which is dry [ and ] sweet from that which is wet—thou dost place wealth in the house of the worshipper. Thou art the sole master of all. Thou art therefore deserving of praise.

७. जो तूं आपल्या करणीनें पुष्पवती आणि फलवती वनस्पतींस भूमीवर स्थापिता झालास, जो द्यूपासून अनुपम विजा उत्पन्न करिता झालास, [ आणि ] महा विस्तीर्ण [ असा जो तूं ] विस्तीर्ण समुद्र [ उत्पन्न करिता झालास ], तो तूं स्तुत्य आहेस.

7. Thou who by thy order didst place in the field the blooming and fruitful plants, and who didst create the matchless thunderbolts of heaven, [ and ] thou who art vast didst create the deep seas —thou, [ o Indra ], art therefore, deserving of praise.

६. 'ओल्यापासून सुकें आणि गोड दोहतोस '=' आर्द्रात् आ शुष्कं मधुमत् दुदोहिथ.' म्हणजे 'ओल्या झाडापासून सुकें धान्य निर्माण करितोस ' असें सायण म्हणतात, तसें असेल.

७. 'ज्याणें शेतांत पुष्पांचीं आणि फळांचीं झाडें उत्पन्न केलीं, ज्याणें विद्युल्लता उत्पन्न केल्या, आणि ज्याणें समुद्र उत्पन्न केले तो तूं इंद्र स्तुतीस पात्र आहेस.' या मंत्रांत अडचण इतकी दिसते कीं, 'अवनी ' शब्दाचा मार्ग प्रवाह किंवा भूमि असा नेहमीचा अर्थ सोडून ओषधी असा अर्थ करावा लागतो.

यो नार्मरं सहवसुं निहन्तवे पृक्षाय च दासवेशाय चावहः ।
ऊर्जयन्त्या अपरिविष्टमास्यमुतैवाद्य पुरुकृत्सास्युक्थ्यः ॥ ८ ॥

यः । नार्मरम् । सहऽवसुम् । निऽहन्तवे । पृक्षाय । च । दासऽवेशाय । च । अवहः ।
ऊर्जयन्त्याः । अपरिऽविष्टम् । आस्यम् । उत । एव । अद्य । पुरुऽकृत् । सः । असि । उक्थ्यः ॥ ८ ॥

शतं वा यस्य दश साकमाद्य एकस्य श्रुष्टौ यद्ध चोदमाविथ ।
अरज्जौ दस्यून्त्समुनब्दभीतये सुप्राव्यो अभवः सास्युक्थ्यः॥ ९ ॥

शतम् । वा । यस्य । दश । साकम् । आ । अद्यः । एकस्य । श्रुष्टौ । यत् । ह । चोदम् । आविथ ।
अरज्जौ । दस्यून् । सम् । उनप् । दभीतये । सुप्रऽअव्यः । अभवः । सः । असि । उक्थ्यः ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. हे पुरुकृत् (=बहुवीर्यकर्मकारिन्) यः पृक्षाय च दासवेशाय च (=पृक्षनामकस्य कस्यचिदुपासकस्य दासवेशनामकस्य च अन्यस्योपासकस्य रक्षणाय) ऊर्जयन्त्याः (=बलवत्या वज्रधारायाः) अपरिविष्टं (=कोशान्निष्कासितम्) आस्यम् (=अग्रं) निहन्तवे (=प्रहाराय) नार्मरं सहवसुम् (=एतन्नामकावसुरौ प्रति) अवहः (=प्रापयः) स [त्वम्] उतैवाद्य (=इदानीमपि) उक्थ्योसि (=प्रशस्यो भवसि)॥

९. यद्ध एकस्य श्रुष्टौ चोदम् आविथ (=यदा किल एकस्य कस्यचित् कवेराह्वानवचनं श्रुत्वा तं कविं ररक्षिथ तदा) यस्य [तव] शतं वा दश [हरीन्] (=एकसहस्रम् अश्वान्) साकं (=सहैव) आद्यः (=रथेबध्नाः=अयोजयः) [ यस्त्वं ] दभीतये [ नाम कस्मैचिदुपासकाय ] दस्यून् (=अनार्यान् शत्रून्) अरज्जौ (=कारागृहे) सम् उनप् (=सम्यगहिंसः) [ यश्च त्वं ] सुप्राव्यो अभवः (=सुप्राविताभूः) स [ त्वम् ] उक्थ्योसि (=प्रशस्यो भवसि)॥

८. जो पृक्षाला आणि दासवेशाला रक्षण्यासाठीं प्रबळ वज्रधारेचें बाहेर काढिलेलें अग्र वध करण्यासाठीं नार्मराप्रत आणि सहवसूप्रत नेता झालास, तो तूं हे बहुपराक्रमकारी [इंद्रा], आजहि स्तुत्य आहेस.

९. त्वां एकाची हाक ऐकून कवीला रक्षिलें त्या प्रसंगीं ज्यापेक्षां तुझ्या रथाला एकै हजार घोडे जोडिता झालास [ आणि ] तूं दभीतीसाठीं कारागृहीं दस्यूंचा वध करिता झालास, तूं फार सुलभ झालास, त्यापेक्षां तू स्तुत्य आहेस.

8. Thou, o achiever of great deeds, who for saving Priksha and Dâsaves'a didst bring the unsheathed point of the powerful thunderbolt to Nârmara and to Sahavasu for to strike,—thou, therefore, art even today deserving of praise.

9. Since thou didst tie ten times hundred [horses] together to thy [ chariot ] when thou didst save the poet on hearing the call, [ and since ] thou didst for Dabhîti destroy the demons in the prison and become most accessible, thou art therefore deserving of praise.

---

८. 'नार्मर' आणि सहवसु या असुरांविषयीं कांहीं इतिहास प्रसिद्ध नाहीं. आणि पृक्ष व दासवेश या भक्तांविषयींहि कांहीं ठाऊक नाहीं.

९. भावार्थः– ' एका कवीनें तुला हाक मारितांच ती ऐकून त्याला रक्षावयास तूं गेलास तो तुझ्या रथास एकदम सहस्र घोडे जोडून गेलास, आणि दभीति या उपासकाला रक्षण्यासाठीं शत्रूंस कारागृहीं मारून टाकिलेंस आणि उपासकांला सुलभ झालास. त्यापेक्षां तूं स्तुत्य आहेस.'

यांत ' शतं दश ' आणि ''अरज्जौ ' यांचा अर्थ आम्हीं केवळ सायणांप्रमाणें केला आहे.

यांत कवि सांगितलेला तो कोण हें कळत नाहीं. दभीतिविषयीं सू. ११२ मं. २३ पहा.

विश्वेदनु रोधना अस्य पौंस्यं ददुरस्मै दधिरे कृत्नवे धनम् ।
षळस्तभ्ना विष्टिरः पञ्च संदृशः परि परो अभवः सास्युक्थ्यः
॥ १० ॥ ११ ॥

विश्वाः । इत् । अनु । रोधनाः । अस्य । पौंस्यम् । ददुः । अस्मै ।
दधिरे । कृत्नवे । धनम् ।
षट् । अस्तभ्नाः । विऽस्तिरः । पञ्च । सम्ऽदृशः । परि । परः । अभवः । सः । असि । उक्थ्यः ॥ १० ॥ ११ ॥

सुप्रवाचनं तव वीर वीर्यं१यदेकेन क्रतुना विन्दसे वसु ।
जातूष्ठिरस्य प्र वयः सहस्वतो या चकर्थ सेन्द्र विश्वास्युक्थ्यः॥ ११

सुऽप्रवाचनम् । तव । वीर । वीर्यम् । यत् । एकेन । क्रतुना । विन्दसे ।
वसु ।
जातूऽस्थिरस्य । प्र । वयः । सहस्वतः । या । चकर्थ । सः । इन्द्र ।
विश्वा । असि । उक्थ्यः ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

१०. विश्वेत् (=विश्वाः इत्=सर्वा अपि) रोधनाः (=नद्यः) अस्य (=इन्द्रस्य) पौंस्यमनु ददुः (=वीर्यमनु दधुः =तस्य पौंस्यमनुसृत्य धारयन्ति=तस्य बलाचासां बलं निकृष्टं भवति)। अस्मै कृत्नवे धनम् [अनु] दधिरे (=तस्य धनमनुसृत्य धनं धारयन्ति =तस्य धनाचासां धनं निकृष्टं भवति)।—[हे इन्द्र], त्वं षट् विस्तिरः (=? "षट्संख्याका उर्वीः द्यौश्च पृथिवी चाहश्च रात्रिश्चापश्चौषधय इत्येवंरूपाः") पञ्च संदृशः (=दिशश्च) अस्तभ्नाः (=नियमितवानसि =स्वे स्वे स्थले स्थापितवानसि)। [तथा कृत्वा] परः पर्यभवः (=परस्तात् पर्यतिष्ठः =ताः सर्वा अपि व्याप्य परस्तादतिष्ठः)। स [त्वम्] उक्थ्योसि (=प्रशस्यो भवसि)॥

११. हे वीर, एकेन क्रतुना (=एकेनैव वीर्यकर्मणा) सहस्वतः (=बलवतो) जातूष्ठिरस्य (=एतन्नामकस्य) [कस्यचिदसुरस्य] वसु वयः (=धनमन्नं च) यद् विन्दसे (=लभसे हृतवानसि) तत् सुप्रवाचनं (=शोभनस्तवनयोग्यं) तव वीर्यं (=शौर्यं) [भवति]। हे इन्द्र, या विश्वा चकर्थ (=यानि विश्वानि त्वं कृतवान् =यस्त्वमेतत्सर्वं कृतवानसि) स [त्वम्] उक्थ्योसि (=प्रशस्यो भवसि)॥

१०. सर्वेहि नद्यांचें बळ याच्या बळापेक्षां थोडें आहे; या पराक्रमकर्त्या इंद्राच्या धनापेक्षां त्यांचें धन थोडें आहे.—[ हे इंद्रा ], त्वां सहा उर्वी आणि पांच दिशा त्यांच्या त्यांच्या स्थानीं स्थापिल्या आहेत. आणि या सर्वांस वेष्टून तूं अधिक राहिला आहेस. तो तूं स्तुत्य आहेस.

10. All the rivers yield to him in strength. They yield to him, the brave one, in wealth.—Thou didst establish the six worlds and the five quarters of the globe, [and] surrounding them didst reach even beyond. Thou art, therefore, deserving of praise.

११. हे वीरा, तूं जो एकाच पराक्रमकर्त्यानें धन हरण करिता झालास, बलाढ्य जातूष्ठिराचें द्रव्य [ हरण करून घेता झालास ], तें तुझें शौर्य अत्यंत श्लाघ्य [ होय ]. जो तूं हें सर्व करिता झालास तो हे इन्द्रा, तूं स्तुत्य आहेस.

11. It is praiseworthy puissance of thine, o hero, that thou didst, with one heroic deed, obtain the wealth—the affluence of mighty Jâtûshṭhira, o Indra! Thou who didst all these things art deserving of praise.

---

१०. 'सर्व नद्यांचें बळ आणि धन तुझ्या बळापेक्षां आणि धनापेक्षां कमी आहे. तूं सहा लोकांस आणि पांच दिशांस त्यांच्या त्यांच्या ठिकाणीं ठेवून तूं त्यांस व्यापून त्यांच्या पलीकडेस आणखी उरलास.'

'सहा उर्वी'=' षट् विरितरः'. सहा लोक कोणते ह्याविषयीं संशय आहे. ( सायणांनीं सांगितलेले भाषेंत घेतले आहेत ). कदाचित् सू. १०२ मं.८ येथें सांगितलेले जे तीन भूलोक आणि तीन द्युलोक ते असतील. ( तो मंत्र आणि त्याजवरील टीप पहा ).

११. 'जातूष्ठिर' हा कोण होता हें ठाऊक नाहीं. त्याची धनसंपत्ति एकच पराक्रमकर्म करून म्हणजे पहिल्या हल्ल्यासरशीं इंद्र हरण करिता झाला इतकें मात्र या मंत्रावरून निघतें.

अरमयः सरपसस्तराय कं तुर्वीतये च वय्याय च स्रुतिम् ।
नीचा सन्तमुदनयः परावृजं प्रान्धं श्रोणं श्रवयन्त्सास्युक्थ्यः॥१२

अरमयः । सरःऽअपसः । तराय । कम् । तुर्वीतये । च । वय्याय ।
च । स्रुतिम् ।
नीचा । सन्तम् । उत् । अनयः । पराऽवृजम् । प्र । अन्धम् । श्रोणम् ।
श्रवयन् । सः । असि । उक्थ्यः ॥ १२ ॥

अस्मभ्यं तद्वसो दानाय राधः समर्थयस्व बहु ते वसव्यम् ।
इन्द्र यच्चित्रं श्रवस्या अनु द्यून्बृहद्वदेम विदथे सुवीराः॥१३॥१२॥

अस्मभ्यम् । तत् । वसो इति । दानाय । राधः । सम् । अर्थयस्व ।
बहु । ते । वसव्यम् ।
इन्द्र । यत् । चित्रम् । श्रवस्याः । अनु । द्यून् । बृहत् । वदेम । वि-
दथे । सुऽवीराः ॥ १३ ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१२. तुर्वीतये च वय्याय च तराय कं (=तुर्वीतिश्च वय्यश्च यथा सुखेन उत्तीर्णौ भवतस्तथा) [त्वं] सरपसः स्रुतिं (=नद्याः प्रवाहम्) अरमयः (=स्तब्धगतिमकरोः)। अन्धं श्रोणं परावृजं नीचा सन्तम् (=अन्धं पङ्गुम् आपत्सु पतितं च परावृजं नामोपासकं) प्र श्रवयन् उदनयः (=आपद्भ्य उन्नीतवानसि प्रख्यातं च कृतवानसि)॥

१३. हे इन्द्र, [त्वं] यद् (=यथा अनु द्यून् (=दिने दिने) चित्रं श्रवस्याः (=दिने दिने चित्रं श्रेष्ठं श्रवो हविरन्नमिच्छेस्) तत् (=तथा) ते (=तव) बहु राधः (=अन्नं) वसव्यं (=धनं च) अस्मभ्यं दानाय समर्थयस्व (=अस्मभ्यं दातुं योजय)। [अनन्तरं] सुवीराः (=शोभनवीर्योपेतपुत्रपौत्रैः सहिता) विदथे (=यज्ञे) बृहत् (=महत् स्तोत्रं) वदेम (=ब्रूयाम)॥

यदि तव विपुलं धनमस्मभ्यं ददासि तुभ्यं प्रतिदिनं श्रेष्ठं हविर्दास्यामस्त्वया दत्तैर्वीरपुत्रैश्च सहितास्ते स्तोत्राणि वदिष्याम इति भावः॥

१२. तूं तुर्वीतीला आणि वय्याला सहज ओलांडून जातां यावें म्हणून नदीचा प्रवाह थांबविता झालास. आंधळा [ आणि ] पंगु परावृज् भूमिगत झाला असतां तूं त्याचा उद्धार करिता झालास आणि त्याला प्रख्यात करिता झालास. तो तूं स्तुत्य आहेस.

१३. हे वसू इंद्रा, तुझें पुष्कळ धन [ आणि ] द्रव्य तूं आम्हांला देण्याकरितां काढ, कीं जेणेंकरून तूं श्रेष्ठ हविरन्न प्रतिदिवशीं इच्छूं शकशील. चांगल्या वीरांनीं युक्त होत्साते आम्ही तुझी मोठी कीर्ति गाऊं असें कर.

12. Thou didst stop the stream of the river for Turvîti [ and ] Vayya to cross over safely. Thou didst raise Parâvrij who lay low, [ who was ] blind [ and ] lame, making him famous. Thou art therefore worthy of praise.

13. Set thou apart for gift to us, o good [ Indra], thy plentiful affluence [and] wealth, so that thou mayest wish o Indra, for good oblation from day to day. May we, accompanied by brave sons, sing great praises [ to thee ] in the sacrifice.

---

१२. तुर्वीति आणि वय्य यांविषयीं सू. ३६ मं. १८ आणि सू. ६१ मं. ११ आणि टीप पहा. परावृज् याविषयीं सू. ११२ मं. ८ आणि त्याजवरील टीप पहा.

१३. 'हे इंद्रा, तूं जर आम्हांला तुझें विपुल धन देशील तर, तुला नित्य आम्ही उत्तम उत्तम हविरन्न देऊं आणि त्वां दिलेल्या पुत्रपौत्रांसहित तुझें मोठें स्तोत्र यज्ञांत गाऊं' असें तात्पर्य.

वसु हें इतर देवांप्रमाणें इंद्रानें विशेषण येतें, त्याचा अर्थ चांगला, साधु असा होतो.

## सूक्तम् १४–२०५.

गृत्समद ऋषिः । इन्द्रो देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**अध्वर्यवो भरतेन्द्राय सोममामत्रेभिः सिञ्चता मद्यमन्धः ।**
**कामी हि वीरः सदमस्य पीतिं जुहोत वृष्णे तदिदेष वष्टि ॥१॥**

अध्वर्यवः । भरत । इन्द्राय । सोमम् । आ । अमत्रेभिः । सिञ्चत । मद्यम् । अन्धः ।
कामी । हि । वीरः । सदम् । अस्य । पीतिम् । जुहोत । वृष्णे । तत् । इत् । एषः । वष्टि ॥ १ ॥

**अध्वर्यवो यो अपो वव्रिवांसं वृत्रं जघानाशन्येव वृक्षम् ।**
**तस्मा एतं भरत तद्वशायँ एष इन्द्रो अर्हति पीतिमस्य ॥ २ ॥**

अध्वर्यवः । यः । अपः । वव्रिऽवांसम् । वृत्रम् । जघान । अशन्याऽइव । वृक्षम् ।
तस्मै । एतम् । भरत । तत्ऽवशाय । एषः । इन्द्रः । अर्हति । पीतिम् । अस्य ॥ २ ॥

### भाषायाम्.

१. हे अध्वर्यवः (=अध्वरस्य नेतारः सोमाभिषवकर्तारः), इन्द्राय सोमं भरत (=आनयत) । मद्यं (=मदकारि) अन्धः (=सोमरूपमन्नम्) अमत्रेभिः (=पात्रैः) आ सिञ्चत (=अग्नौ प्रक्षिपत) । हि (=यस्मात् कारणात्) [अयं] वीरः सदम् अस्य कामी (=सदैव सोमस्य कामयिता) [भवति] । वृष्णे (=वीराय तस्मै) पीतिं (=सोमपानं =पेयं सोमं) जुहोत (=जुहुत) । एष तदित् (=तदेव) वष्टि (=कामयते)॥

२. हे अध्वर्यवः, यः अपो वव्रिवांसम् (=उदकानि वेष्टितवन्तं) वृत्रं वृक्षमिव अशन्या (=वज्रेण) जघान तस्मै तद्वशाय [इन्द्राय] (=सोमकामिने तस्मै) एतं [सोमं] भरत (=प्रयच्छत) । एष इन्द्रः अस्य (=तस्य सोमस्य) पीतिं (=पानम्) अर्हति ॥

## सूक्त १४–२०५.

ऋषि–गृत्समद. देवता–इन्द्र. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. हे अध्वर्यू हो, इंद्राला सोम अर्पण करा. मदकारी सोमरस पात्रांनीं ओता. कारण कीं त्या वीराला नित्य याची आवड आहे. [ या ] वीराला [ सोम]पान अर्पण करा. हा तेंच वांछितो.

२. हे अध्वर्यू हो, उदकांला वेष्टून राहिलेल्या वृत्राला वृक्ष तोडिल्याप्रमाणें जो [ आपल्या ] वज्रानें तोडिता झाला, त्या सोमकामीला हा [ सोम ] तुम्ही अर्पण करा. हा इंद्र त्याच्या पानास योग्य आहे.

## HYMN 14–205.

To *Indra.* By *Gritsamada.* Metre—*Trishtubh.*

1. Bring, o Adhvaryus, the soma to Indra. Pour out the exhilarating drink with the vessels. For the hero is always fond of it. Offer the drink to brave [ Indra ]. He desires nothing but that.

2. O Adhvaryus, he who smashed like a tree with the thunderbolt Vritra who had surrounded the waters—offer to him this soma, to him who loves it. This Indra deserves to drink it.

---

१. ह्या आणि पुढच्या सूक्तांत सोमावर इंद्राची किती प्रीति आहे, व त्याचें पान करून इंद्राला बळ प्राप्त झाल्यावर त्याणें काय काय पराक्रम केले तें सांगितलें आहे. याजवरून प्राचीनकाळीं सोमाचें कसें महत्त्व असे व वस्तुतः त्याचें स्वरूप कसें होतें तें समजून येतें.

सोमरस सिद्ध करून तो अर्पण करणें हें अध्वर्यू नांवाच्या ऋत्विजाचें काम असे.

अध्व॑र्यवो॒ यो दृभी॑कं ज॒घान॒ यो गा उ॒दाज॒दप॒ हि व॒लं वः ।
तस्मा॑ ए॒तम॒न्तरि॑क्षे न वात॒मिन्द्रं॒ सोमै॒रोर्णु॑त॒ जूर्न वस्त्रैः॑ ॥ ३ ॥
अध्व॑र्यवः । यः । दृभी॑कम् । ज॒घान॑ । यः । गाः । उ॒त्ऽआज॑त् ।
　अप॑ । हि । व॒लम् । वरि॑ति॒ वः ।
तस्मै॑ । ए॒तम् । अ॒न्तरि॑क्षे । न । वात॑म् । इन्द्र॑म् । सोमैः॑ । आ । ऊ॒र्णु॒त॒ । जूः । न । वस्त्रैः॑ ॥ ३ ॥
अध्व॑र्यवो॒ य उर॑णं ज॒घान॒ नव॑ च॒ख्वांसं॑ नव॒तिं च॑ बा॒हून् ।
यो अर्बु॑द॒मव॑ नी॒चा ब॑बा॒धे तमिन्द्रं॒ सोम॑स्य भृ॒थे हि॑नोत ॥ ४ ॥
अध्व॑र्यवः । यः । उर॑णम् । ज॒घान॑ । नव॑ । च॒ख्वांस॑म् । न॒व॒तिम् । च॒ ।
　बा॒हून् ।
यः । अर्बु॑दम् । अव॑ । नी॒चा । ब॒बा॒धे । तम् । इन्द्र॑म् । सोम॑स्य ।
　भृ॒थे । हि॒नो॒त ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. हे अध्वर्यवः, यो दृभीकं [ नामासुरं ] जघान यो गा उदाजत् ( =निरगमयत् ) [ अपि च ] वलम् अप वः ( =वलं नामासुरम् अपावृणोत् =वलेन निरुद्धानाम् अपाम् अपवरणाय तम् अहिंसत् ) तस्मै एतं [ सोमम् ] अन्तरिक्षे वातं न ( =वायुमिव ) [ सृजत ] । -वस्त्रैर्जूर्न ( =?" जीर्णां यथा वस्त्रैरङ्गमाच्छादयति तद्वत्" ) सोमैरिन्द्रम् आ ऊर्णुत ( =सर्वत आच्छादयत ) ॥

४. हे अध्वर्यवः, यो नव नवतिं च (=नवाधिकनवतिं) बाहून् चख्वांसं (=?" दर्शयन्तं " =प्रक्षिप्तवन्तम् ) उरणं [ नामासुरं ] जघान यो अर्बुदं [ नामासुरं ] अव नीचा बबाधे ( =अधोमुखं कृत्वा अवबबाधे ) तम् इन्द्रं सोमस्य भृथे ( =भरणे संपादने सति =सोमम् अर्पयित्वा ) हिनोत ( =हिनुत=स्तोत्रैः प्रीणयत ) ॥

३. हे अध्वर्यू हो, जो दृभीकाचा वध करिता झाला, जो गाईला मुक्त करिता झाला आणि वलातें फोडिता झाला; त्याला हा सोम अंतरिक्षांत वायू [ सोडिल्या]-प्रमाणें [ सोडा ]. वृद्ध मनुष्य वस्त्रांनीं [ आपलें आंग झांकितो ] त्याप्रमाणें इंद्राला सोमरसांनीं झांकून टाका.

3. O Adhvaryus, he who killed Dṛibhîka, who freed the cows, who broke open Vala—to him [let go] this [Soma] like wind in the sky. As an old man [covers himself] with clothes, cover Indra with libations of Soma.

४. हे अध्वर्यू हो, जो नव्याण्णव बाहु पसरणाऱ्या उरणाचा वध करिता झाला, जो अर्बुदाला खालीं पाडून निर्दाळिता झाला, त्या इंद्राला सोम अर्पण करून प्रसन्न करा.

4. O Adhvaryus, he who killed Uraṇa, that spread out his nine and ninty arms, he who laid low Arbuda to the earth, propitiate that Indra by an offering of the soma.

---

३. दृभीकाविषयीं कांहीं ठाऊक नाहीं. वलाविषयीं सू. ५२ मं. ५ आणि टीप पहा.

या मंत्रांतील शेवटील पादांत जी उपमा सांगितली आहे ती दुर्बोध आहे. कारण कीं, 'जू' शब्दाचा अर्थ येथें समजत नाहीं, दुसऱ्या दोन ठिकाणीं तो शब्द आला आहे तेथें वेगवान् असा अर्थ आहे तो येथें लागत नाहीं.

'अंतरिक्षांत वायु सोडिल्याप्रमाणें' =' अन्तरिक्षे वातं न '. म्ह. हा सोम तुम्हीं सोडिल्यावर वायु जसा सर्व अंतरिक्षास झांकून टाकितो आणि वेगानें धांवतो त्याप्रमाणें हा इंद्रशरीरास व्यापील आणि त्याला वेगयुक्त करील. असा अभिप्राय दिसतो.

४. उरणाविषयीं या शिवाय ऋग्वेदांत कोठें पुनः उल्लेख आलेला नाहीं.

अर्बुदाविषयीं सू. ५१ मं. ६ आणि टीप पहा.

अध्वर्यवो यः स्वश्नं जघान यः शुष्णमशुषं यो व्यंसम् ।
यः पिप्रुं नमुचिं यो रुधिक्रां तस्मा इन्द्रायान्धसो जुहोत ॥ ५ ॥
अध्वर्यवः । यः । सु । अश्नम् । जघान । यः । शुष्णम् । अशुषम् ।
यः । विऽअंसम् ।
यः । पिप्रुम् । नमुचिम् । यः । रुधिऽक्राम् । तस्मै । इन्द्राय । अन्धसः ।
जुहोत ॥ ५ ॥
अध्वर्यवो यः शतं शम्बरस्य पुरो बिभेदाश्मनेव पूर्वीः ।
यो वर्चिनः शतमिन्द्रः सहस्रमपावपद्भरता सोममस्मै ॥६॥१३॥
अध्वर्यवः । यः । शतम् । शम्बरस्य । पुरः । बिभेद । अश्मनाऽइव ।
पूर्वीः ।
यः । वर्चिनः । शतम् । इन्द्रः । सहस्रम् । अपऽअवपत् । भरत ।
सोमम् । अस्मै ॥ ६ ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

५. हे अध्वर्यवः, यः अश्नम् [असुरं] जघान यः अशुषं (=सर्वस्य भक्षयितारं) शुष्णं यो व्यंसम् [असुरम्] यः पिप्रुं नमुचिं [च] यो रुधिक्रां [नामासुरं] [जघान] तस्मा इन्द्राय अन्धसः (=सोमलक्षणस्यान्नस्य) [आहुतीर्] जुहोत (=जुहुत =अग्नौ प्रक्षिपत) ॥

६. हे अध्वर्यवः, यः शम्बरस्य [नाम शत्रोः] शतं पूर्वीः पुरः (=शतं पुरातनानि नगराणि) अश्मनेव (=वज्रेणेव) बिभेद यश् [च] इन्द्रो वर्चिनो [नामानार्यस्य शत्रोः] शतं सहस्रं (=शतसहस्रसंख्याकान्) [वीरान् =पुत्रादीन्] अपावपद् (=हत्वा भूमौ पातितवान्) अस्मै (=तस्मै) सोमं भरत (=अर्पयत) ॥

५. हे अध्वर्यू हो, जो अश्नास मारून टाकिता झाला, जो सर्वभक्षी शुष्णाला, जो व्यंसाला, जो पिप्रूला, नमुचीला, [ आणि ] जो रुधिक्राला मारिता झाला, त्या इंद्राला सोमरस अर्पण करा.

5. O Adhvaryus, he who slew As'na, who [slew] devouring S'ushna, who [slew] Vyam̐sa, who [slew] Pipru [and] Namuchi, [and] who [slew] Rudhikrâ, to that Indra pour [libations] of the juice.

६. हे अध्वर्यू हो, जो शंबराचीं शंभर पुरातन नगरें वज्रानें [ विध्वंसिल्या]प्रमाणें विध्वंसिता झाला, जो वर्चीचे शंभर हजार [ वीर ] भूमिगत करिता झाला, त्याला सोम अर्पण करा.

6. O Adhvaryus, he who destroyed the hundred ancient cities of S'ambara as if with the thunderbolt, [and] who rased to the ground the hundred thousand warriors of Varchin, to that Indra offer the soma.

---

५. 'अश्न'. अंगिरसांचीं स्तोत्रें ऐकून इंद्रानें अश्नाचीं नगरें फोडिलीं असें ऋ. २.२०.५ यांत सांगितलें आहे. ऋ. ६.४.३ यांतहि अश्नाचीं नगरें इंद्रानें फोडून टाकिलीं असें सांगितलें आहे. याशिवाय दुसरी कांहीं कथा ठाऊक नाहीं.

'शुष्ण'. सू. ५४ मं.६ आणि टीप पहा.

'व्यंस'. सू. १०१ मं.२ आणि टीप पहा.

'पिप्रु'. सू. ५१ मं. ५. 'नमुचि'. सू. ५३ मं. ७ आणि टीप पहा.

'रुधिक्रा' या असुराविषयीं कांहींच ठाऊक नाहीं. दुसऱ्या ठिकाणीं हें नांव आलेलें नाहीं.

६. 'शंबर'. सू. ५१ मं. ६ आणि टीप पहा.

'वर्ची'. हा एक अनार्य जातीचा म्हणजे आर्यव्यतिरिक्त जे कोळी इत्यादि लोक त्यांपैकीं एक शत्रु होता असें दिसून येतें. ऋ. ४. ३०.१५ यांत 'दास वर्चीचे' ( म्हणजे अनार्य वर्चीचे ) एक लक्ष वीर इंद्रानें मारिले असें सांगितलें आहे. ऋ. ६. ४७. २१ यांत शंबर आणि वर्ची या दोन अनार्य शत्रूंला इंद्रानें उदव्रज देशांत मारिलें असें सांगितलें आहे. ऋ. ७. ९९.५ यांत वर्चीचे एक लक्ष वीर एका काळीं मारिले असें सांगितलें आहे.

वर्चीचे एक लक्ष वीर मारिले आणि शंबराचीं शंभर नगरें विध्वंसिलीं ह्या दोन्ही गोष्टी बहुतकरून एकाच मंत्रांत येतात, आणि दोघांसहि 'दास' (अनार्य) असें म्हटलें आहे. यावरून शंबर आणि वर्ची

२. तो याला प्रथम पुरतो, तो दुसऱ्या वेळेस आणि तो मनुष्याचा होता तिसऱ्या वेळस [ पुरतो ]. भलतीचा पुत्र असा तो भलत्यांचपासून उत्पन्न झाला. त्या प्रशस्त वीराचें पाळणपोषण भलतेच करितात.

2. He is enough for him the first, he the second time, and he the men's priest the third time. Offspring of one he is begotten by others. He the noble hero, is brought up by others.

समजल्यास चार जुकडांचा इत्यादिक विशेषणांचा अर्थ काय समजावयाचा तें भाषेखालीं पहा.

'दहा अरित्रांचा' = 'दशारित्रः.' अरित्र म्हणजे वल्ह अथवा तोंड ( दरवाजा ? ) असें सायण म्हणतात.

२. यांत पदशः अर्थ उघड आहे तो आम्हीं वर दिला आहे. यांत तो म्ह० कोण तें समजत नाहीं. ऋषीनेंच ऋचा रचितांना गूढार्थ रचिली आहे. सायण तो म्ह० 'यज्ञ किंवा सोम' असें म्हणतात. तसें असेल, किंवा अग्नि विवक्षित असेल. भाषेखालीं पहा.

**हरी नु कं रथ इन्द्रस्य योजमायै सूक्तेन वचसा नवेन ।**
**मो षु त्वामत्र बहवो हि विप्रा नि रीरमन्यजमानासो अन्ये॥३॥**

हरी इति । नु । कम् । रथे । इन्द्रस्य । योजम् । आऽयै । सुऽउक्तेन ।
वचसा । नवेन ।
मो इति । सु । त्वाम् । अत्र । बहवः । हि । विप्राः । नि । रीरमन् ।
यजमानासः । अन्ये ॥ ३ ॥

**आ द्वाभ्यां हरिभ्यामिन्द्र याह्या चतुर्भिरा षड्भिर्हूयमानः ।**
**आष्टाभिर्दशभिः सोमपेयमयं सुतः सुमख मा मृधस्कः ॥ ४ ॥**

आ । द्वाभ्याम् । हरिऽभ्याम् । इन्द्र । याहि । आ । चतुःऽभिः । आ ।
षट्ऽभिः । हूयमानः ।
आ । अष्टाभिः । दशऽभिः । सोमऽपेयम् । अयम् । सुतः । सुऽमख ।
मा । मृधः । करिति कः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. नु कम् (=इदानीम्) आयै (=आगमनाय) इन्द्रस्य रथे सूक्तेन नवेन वचसा (=शोभनं यथा तथा प्रोच्चारितेन अनन्यपूर्वकृतेन स्तोत्रेण) हरी (=एतन्नामकाविन्द्रस्याश्वौ) योजं (=युनज्मि=युनजानि) ।—[हे इन्द्र], अत्र (=अस्मिन् समये) बहवो विप्राः (=मेधाविनः स्तोतारः) अन्ये यजमानाश् [च] त्वां मो षु हि नि रीरमन् (=नितरां मा रमयन्तु सोमपानार्थम् आगमनप्रवृत्तस्य तव मा विघ्नं कुर्वन्तु) ॥

४. हे इन्द्र, हूयमानः (=अस्माभिराहूयमानस्त्वं) सोमपेयं (=सोमपानार्थं) द्वाभ्यां हरिभ्याम् (=अश्वाभ्याम्) आ याहि [अथवा] चतुर्भिरा [याहि] [अथवा] षड्भिरा [याहि] [अथवा] अष्टाभिरा [याहि] दशभिर् [वायाहि] । हे सुमख (=सुयज्ञ), अयम् [अत्र] सुतः (=अभिषुतः सोमो) [भवति] । मा मृधः कः (=मावज्ञां कुरु) ॥

३. आतां इंद्रानें यावें म्हणून मला त्याच्या रथास सुंदर रीतीनें गाइलेल्या नव्या स्तोत्रानें पिवळ्या घोड्यांची जोडी जोडूं दे.- [ हे इंद्रा], या वेळीं तुला पुष्कळ स्तोते आणि दुसरे यजमान अडवून न ठेवोत.

3. Let me now harness by means of a well-chanted new hymn the tawny horses to Indra's chariot that he may come.—Let not, [o Indra], the many poets and other sacrificers detain thee at this time.

४. हे इंद्रा, तुला आम्ही बोलावीत आहों, तर तूं दोन घोड्यांनीं ये; चार [घोड्यां]नीं ये, सहांनीं ये, सोम प्यावयाला आठ [ घोड्यां]नीं ये, दहांनीं [ये], हे सुयज्ञ [इन्द्रा], हा सोम काढिला आहे. तूं तिरस्कार करूं नकोस.

4. Come by two horses, o Indra, come by four, come by six, thou who art invoked, come by eight [horses] [or] by ten, to drink the soma. Here is the extracted juice, o receiver of good sacrifices. Do not scorn.

---

३. 'नव्या'='नवेन.' म्ह० हें जें मी सूक्त म्हणत आहें तें नवें रचून म्हणत आहें. जुनें दुसऱ्या कोणाचें नव्हे. वैदिक ऋषि आपल्या सूक्तांस अनाद्यनंत समजत नसत.

या ऋचेंत यजमान वेगळे आणि यजमानांकरितां स्तोत्रें रचून तीं म्हणणारे कवि किंवा स्तोते वेगळे हा विवक्षित असलेला भेद ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

६. 'शुनहोत्र' या नांवाचें एक सोम घालण्याचें पात्र होय असें सायण म्हणतात.

**आ विंशत्या त्रिंशता याह्यर्वाङा चत्वारिंशता हरिभिर्युजानः ।**
**आ पञ्चाशता सुरथेभिरिन्द्रा षष्ट्या सप्तत्या सोमपेयम् ॥५॥२१॥**

आ । विंशत्या । त्रिंशता । याहि । अर्वाङ् । आ । चत्वारिंशता । हरिऽभिः । युजानः ।
आ । पञ्चाशता । सुऽरथेभिः । इन्द्र । आ । षष्ट्या । सप्तत्या । सोमऽपेयम् ॥ ५ ॥ २१ ॥

**आशीत्या नवत्या याह्यर्वाङा शतेन हरिभिरुह्यमानः ।**
**अयं हि ते शुनहोत्रेषु सोम इन्द्र त्वाया परिषिक्तो मदाय ॥६॥**

आ । अशीत्या । नवत्या । याहि । अर्वाङ् । आ । शतेन । हरिऽभिः । उह्यमानः ।
अयम् । हि । ते । शुनऽहोत्रेषु । सोमः । इन्द्र । त्वाऽया । परिऽसिक्तः । मदाय ॥ ६ ॥

**मम ब्रह्मेन्द्र याह्यच्छा विश्वा हरी धुरि धिष्वा रथस्य ।**
**पुरुत्रा हि विहव्यो बभूथास्मिञ्छूर सवने मादयस्व ॥ ७ ॥**

मम । ब्रह्म । इन्द्र । याहि । अच्छ । विश्वा । हरी इति । धुरि । धिष्व । रथस्य ।
पुरुऽत्रा । हि । विऽहव्यः । बभूथ । अस्मिन् । शूर । सवने । मादयस्व ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

५. हे इन्द्र, सोमपेयं (=सोमपानं प्रति) विंशत्या (=विंशतिसंख्याकैस्) त्रिंशता, चत्वारिंशता [वा] हरिभिः (=अश्वैर्) युजानः (=युक्तः सन्) अर्वाङ् आ याहि (=अस्मदभिमुख आ याहि) [अथ वा] पञ्चाशता (=एतत्संख्याकैः) सुरथेभिः (=शोभनरथयुक्तैरश्वैर्) आ [याहि] [अथ वा] षष्ट्या सप्तत्या [वा] (=षष्टिसंख्याकैः सप्ततिसंख्याकैर्) [वा] आ [याहि] ॥

६. अशीत्या नवत्या [वा] अर्वाङ् (=अस्मदभिमुख) आ याहि । शतेन हरिभिः (=अश्वैर्) उह्यमानः (=धार्यमाणस्त्वम्) आ [याहि]. । हि (=यस्मा-

५. हे इंद्रा, तूं वीस [अथवा] तीस घोडे जोडून ये. [अथवा] चाळीस घोडे जोडून ये, सुंदर रथास जोडिलेल्या पन्नास [घोड्यां]नीं ये, सोम प्यावयास साठ [अथवा] सत्तर [घोड्यां]नीं ये.

६. ऐशीं [अथवा] नव्वद घोड्यांनीं येथें ये [अथवा] शंभर घोडे जोडून ये. कारण कीं हे इंद्रा, तुला मद येण्यासाठीं हा सोम त्वद्भक्तिपुरःसर शुनहोत्रांत ओतिला आहे.

७. हे इंद्रा, तूं माझ्या स्तोत्राप्रत ये. तुझे दोनहि घोडे रथाच्या धुरेला जोड. तुला जरी पुष्कळ ठिकाणीं बोलाविलें असेल तरी हे शूरा, या [आमच्याच] यज्ञांत तूं सोम पिऊन हर्ष पाव.

5. Come hither, drawn by twenty [or] by thirty [or] by forty horses; come by fifty horses harnessed, o Indra, to an excellent chariot, come by sixty [or] by seventy horses to drink the soma.

6. Come hither by eighty [or] by ninty [horses], come drawn by a hundred horses; for here, o Indra, is soma for thy exhilaration, poured into the S'unahotras out of love for thee.

7. Come to my hymn, o Indra, put both thy horses to the yoke of [thy] chariot. Thou hast indeed been the object of invocation in many places; but be thou, o hero, gratified nowhere else but in this our sacrifice.

न म इन्द्रेण सख्यं वि योषदस्मभ्यमस्य दक्षिणा दुहीत ।
उप ज्येष्ठे वरूथे गभस्तौ प्रायेप्राये जिगीवांसः स्याम ॥ ८ ॥
न । मे । इन्द्रेण । सख्यम् । वि । योषत् । अस्मभ्यम् । अस्य । दक्षिणा । दुहीत ।
उप । ज्येष्ठे । वरूथे । गभस्तौ । प्रायेऽप्राये । जिगीवांसः । स्याम ॥८
नूनं सा ते प्रति वरं जरित्रे दुहीयदिन्द्र दक्षिणा मघोनी ।
शिक्षा स्तोतृभ्यो माति धग्भगो नो बृहद्वदेम विदथे सुवीराः॥९॥२२
नूनम् । सा । ते । प्रति । वरम् । जरित्रे । दुहीयत् । इन्द्र । दक्षिणा । मघोनी ।
शिक्ष । स्तोतृऽभ्यः । मा । अति । धक् । भगः । नः । बृहत् । वदेम । विदथे । सुऽवीराः ॥ ९ ॥ २२ ॥

---

त्कारणात् ) हे इन्द्र, अयं सोमस्ते मदाय (=तव हर्षाय ) शुनहोत्रेषु [नाम पात्रेषु] त्वाया परिषिक्तः ( =निहितो ) [ भवति ] ॥

शुनहोत्रेषु एतन्नामकेषु जनेषु मध्ये इति पाश्चात्त्याः ॥

७. हे इन्द्र, [ त्वं ] मम ब्रह्म (=मम स्तोत्रं प्रति ) अच्छ याहि ( =आयाहि) । विश्वा हरी ( =विश्वावपि तव हरी=उभावपि तव पीताश्वौ ) रथस्य धुरि धिष्व ( =स्थापय=संयोजय ) । पुरुत्रा ( =बहुषु स्थलेषु ) विहव्यो बभूथ हि ( =विविधम् आह्वानविषयो जातोसि हि ) तदपि हे शूर, अस्मिन् सवने ( =अस्मिन्नस्माकमेव सवने यज्ञे ) मादयस्व ( =सोमपानेन हृष्टो भव ) ॥

---

## भाषायाम्.

८. इन्द्रेण [ सह यत् ] मे सख्यं [ तत्] न वि योषत् (=कदाचिदपि मा वियुज्यताम् ) । अस्य दक्षिणा ( =तस्य दानम् ) अस्मभ्यं दुहीत ( =अभीष्टरूपं दुग्धं दद्यात् ) । [ तस्य ] गभस्तौ उप ज्येष्ठे वरूथे (=तस्य बाहौ श्रेष्ठे संरक्षणोपाये समीपे सति=तादृशस्य बाहोराश्रये वर्तिनो वयं ) प्रायेप्राये ( =सर्वस्मिन्युद्धे ) जिगीवांसः स्याम ( =प्राप्तविजया भवेम ) ॥

९. हे इन्द्र, नूनम् ( =इदानीं ) ते (=तव ) मघोनी (=धनवती ) सा ( =प्रख्याता ) दक्षिणा जरित्रे ( =स्तोत्रे ) वरं (=मनोभिलाषं ) प्रति दुहीयत् (=संपादयेत्) ।

८. इंद्राशीं जें माझें सख्य तें न तुटो. त्याचें औदार्य आमचा मनोरथ पूर्ण करो. याचा जो बाहु त्याच्या श्रेष्ठ आश्रयाखालीं आम्ही प्रत्येक युद्धांत विजयी होऊं असें घडो.

९. आतां हे इंद्रा, तुझी जी धनसमृद्ध प्रख्यात दक्षिणा ती स्तोत्याची मनकामना पूर्ण करो. स्तोत्यांला दे, तूं उदार आम्हांस वगळूं नको. चांगल्या वीरांनीं युक्त होत्साते आम्ही यज्ञांत तुझी मोठी कीर्ति गाऊं असें कर.

8. May my friendship with Indra never be broken. May his bounty flow with milk for us. May we under the excellent protection of his arm be victorious in every battle.

9. Now, Indra, may thy rich bounty fulfil the desire of the poet. Give to us the poets, do not pass us over, thou the liberal one. May we accompanied by brave sons, sing great praises [ to thee ] in sacrifices.

## सूक्तम् १९-२१०.

गृत्समद ऋषिः । इन्द्रो देवता । त्रिष्टुप् छन्दः ।

**अपाय्यस्यान्धसो मदाय मनीषिणः सुवानस्य प्रयसः ।**

**यस्मिन्निन्द्रः प्रदिवि वावृधान ओको दधे ब्रह्मण्यन्तश्च नरः॥ १॥**

अपायि । अस्य । अन्धसः । मदाय । मनीषिणः । सुवानस्य । प्रयसः ।

यस्मिन् । इन्द्रः । प्रऽदिवि । ववृधानः । ओकः । दधे । ब्रह्मण्यन्तः ।

च । नरः ॥ १ ॥

भगः (=दाता त्वं ) नः स्तोतृभ्यः (=अस्मभ्यं स्तोत्रकर्तृभ्यः) शिक्ष ( =देहि ) माति धक् ( =मातिक्रम=प्रथममस्मभ्यं दत्त्वा पश्चादन्येभ्यो देहि ) । सुवीराः ( =शोभनवीर्योपेतैः पुत्रैः सहिताः सन्तो ) विदथे ( =यज्ञे ) बृहत् ( =महत् स्तोत्रं ) वदेम ( =त्वामुद्दिश्य ब्रवाम ) ॥

### भाषायाम्.

१. हे मनीषिणः (=प्राज्ञा यजमानाः), अस्य अन्धसः (=सोमरूपस्यान्नस्य ) [अस्य ] सुवानस्य प्रयसः ( =अभिषूयमाणस्य प्रीतिकरस्य सोमस्य ) [ युष्माभिर् ] मदाय ( =हर्षप्राप्त्यर्थम् ) अपायि ( =अयमभिषूयमाणः सोमो युष्माभिः पीयतां=तं यूयं पिबत ) । यस्मिन् [ अन्धसि ] वावृधानः ( =तत्पानेनातिशयेन प्रवर्धमान ) इन्द्रो ब्रह्मण्यन्तश्च नरः ( =स्तोत्रादिकं कर्म कुर्वन्तश्च यजमानाः) प्रदिवि ( =पुरातनेष्वहःसु=पुरातनकालादारभ्येदानीं यावत् ) ओको दधे ( =सेव्यतया निवासं चक्रुः=आसक्तया सेवन्ते ) ॥

मनीषिण इत्यस्य संबुद्धत्वादाद्युदात्तत्वम् ॥

## सूक्त १९–२१०.

ऋषि–गृत्समद. देवता–इन्द्र. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. हे विद्वान् जन हो, ज्या पेयाच्या ठायीं प्रबळ होत्साता इन्द्र आणि उपासक जन प्राचीन काळापासून सुख भोगीत आले आहेत, तें हें पेय, [ हें ] प्रिय भक्ष्य गाळून काढिलें जात आहे, हें मद येण्याकरितां प्यावें.

## HYMN 19–210.

To *Indra*. By *Gritsamada*. Metre —*Trishtubh*.

1. Let this drink,[this] dear thing which is being pressed, be drunk for exhilaration, o learned men; in which from ancient time have Indra waxing strong and pious men placed their happiness.

---

१. 'जो सोम पिऊन इन्द्र आणि उपासक जन प्राचीन काळापासून प्रबळ झाले आणि त्यामुळें ज्या सोमाला अत्यंत मोठ्या सुखाचा विषय असें मानूं लागले, तो हा सोम गाळून काढिला जात आहे; तर तो तुम्ही प्या' असें सूक्तवक्ता आपल्या विद्वान् मित्रांस म्हणतो.

'प्राचीनकाळापासून'='प्रदिवि.' अक्षरशः प्राचीनकाळीं. ऋ. ३. ४६. ४ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा. या ऋचेवरून प्राचीन आर्य लोक सोमपान केवळ देवांकडून करवीत असें नाहीं, तर आपण स्वतःहि करीत असत आणि सोमपानापासून बळ आणि अत्यंत सुख प्राप्त होतें असें मानीत असत हें उघड आहे.

अस्य मन्दानो मध्वो वज्रहस्तोऽहिमिन्द्रो अर्णोवृतं वि वृश्चत् ।
प्र यद्वयो न स्वसराण्यच्छा प्रयांसि च नदीनां चक्रमन्त ॥ २ ॥
अस्य । मन्दानः । मध्वः । वज्रऽहस्तः । अहिम् । इन्द्रः । अर्णःऽवृतम् । वि । वृश्चत् ।
प्र । यत् । वयः । न । स्वसराणि । अच्छ । प्रयांसि । च । नदीनाम् । चक्रमन्त ॥ २ ॥

स माहिन इन्द्रो अर्णो अपां प्रैरयदहिहाच्छा समुद्रम् ।
अजनयत्सूर्यं विदद्गा अक्तुनाह्नां वयुनानि साधत् ॥ ३ ॥
सः । माहिनः । इन्द्रः । अर्णः । अपाम् । प्र । ऐरयत् । अहिऽहा । अच्छ । समुद्रम् ।
अजनयत् । सूर्यम् । विदत् । गाः । अक्तुना । अह्नाम् । वयुनानि । साधत् ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. अस्य मध्वो मन्दानः ( =अनेन पूर्वोक्तेन मधुरेण सोमरसेन हृष्ट ) इन्द्रो वज्रहस्तः [ सन् ] अर्णोवृतं ( =मेघोदकानाम् आवरकम् ) अहिम् (=अहिसदृशं वृत्रं) वि वृश्चत् ( =विविधम् अच्छिनत् ) । यत् ( =यदा ) नदीनां प्रयांसि ( =प्रीतिकराः प्रवाहा ) अच्छ स्वसराणि वयो न ( =कुलायानभिलक्ष्य पक्षिणो यथा धावन्ति तद्वत् ) प्र चक्रमन्त च ( =प्रकर्षेण गन्तुम् उपाक्रमन् ) ॥

३. माहिनः ( =महान् ) अहिहा ( =अहेर्वृत्रस्य हन्ता ) स इन्द्रः अपाम् अर्णः ( =मेघोदकानां प्रवाहम् ) अच्छ समुद्रं प्रैरयत् ( =समुद्रम् अभिलक्ष्य प्रसृष्टवान् ) । [ स ] सूर्यम् अजनयत् ( =उदपादयत् ) । गा विदत् ( =पणिहृता अङ्गिरसां गा अन्विष्यालभत ) । अक्तुना (=स्वजनितस्य सूर्यस्य तेजसा) अह्नां वयुनानि (=दिवसानां प्रकाशान्=दिवसेषु दृश्यमानानि पदार्थजातानि ) साधत् ( =असाधयत् ) ॥

२. हा मधुर [ सोमरस ] पिऊन हृष्ट झालेला जो इंद्र तो हातांत वज्र घेऊन, उदकांला वेढणाऱ्या अहीला तोडून तुकडे करिता झाला. आणि त्या वेळीं नद्यांचे रमणीय प्रवाह, पक्षी घरट्यांकडे [ धांवतात त्या]प्रमाणें, बाहेर पडून धावूं लागले.

2. Exhilarated by this sweet [soma] Indra, arming himself with the thunderbolt, cut asunder the serpent that hemmed the waters; when the delicious streams of the rivers began to flow even as birds towards their nests.

३. अहीतें मारणारा महान् इंद्र उदकांच्या प्रवाहांला समुद्राकडे पाठवून देता झाला. तो सूर्याला उत्पन्न करिता झाला. तो गाईंचा थांग लाविता झाला. तो तेजानें दिवसांचा प्रकाश साधिता झाला.

3. That great Indra, the killer of the serpent, sent forth the stream of the waters towards the sea. He produced the sun. He discovered the cows. With the light he accomplished the splendors of the days.

---

२. सोम पिऊन इंद्रानें वृत्र मारिला आणि मेघोदकें मुक्त केलीं.

'अहीला '=' अहिम्.' वृत्राला अहि असें नांव आहे. सू. ३२ मं १ आणि टीप पहा.

'बाहेर पडून धावूं लागले '=' प्र चक्रमन्त.' म्हणजे समुद्राकडे मोठ्या वेगानें धावूं लागले असा अर्थ पुढल्या ऋचेवरून गम्यमान दिसतो.

३. 'अंगिरसांच्या गाई पणि नांवांच्या असुरांनीं चोरून नेल्या, त्यांचा, शोध लावण्याकरितां इंद्रानें सूर्य उत्पन्न केला आणि त्या सूर्याच्या प्रकाशानें दिवसास दृष्टि पडणारी सृष्टि दृग्गोचर केली' असा उत्तरार्धाचा भावार्थ आहे. अंगिरसांच्या गाईंविषयीं सू. ६२ मं. २ टीप पहा.

सो अप्रतीनि मनवे पुरूणीन्द्रो दाशद्दाशुषे हन्ति वृत्रम् ।
सद्यो यो नृभ्यो अतसाय्यो भूत्पस्पृधानेभ्यः सूर्यस्य सातौ ॥ ४ ॥

सः । अप्रतीनि । मनवे । पुरूणि । इन्द्रः । दाशत् । दाशुषे । हन्ति । वृत्रम् ।
सद्यः । यः । नृऽभ्यः । अतसाय्यः । भूत् । पस्पृधानेभ्यः । सूर्यस्य । सातौ ॥ ४ ॥

स सुन्वत इन्द्रः सूर्यमा देवो रिणङ्मर्त्याय स्तवान् ।
आ यद्रयिं गुहदवद्यमस्मै भरदंशं नैतशो दशस्यन् ॥ ५ ॥ २३॥

सः । सुन्वते । इन्द्रः । सूर्यम् । आ । देवः । रिणक् । मर्त्याय । स्तवान् ।
आ । यत् । रयिम् । गुहत्ऽअवद्यम् । अस्मै । भरत् । अंशम् । न । एतशः । दशस्यन् ॥ ५ ॥ २३ ॥

---

## भाषायाम्.

४. स इन्द्रो मनवे (=मनुष्याय) अप्रतीनि (=अद्वितीयानि=उत्कृष्टानि) पुरूणि (=बहूनि) [वस्तूनि] दाशत् (=अददात्) [अपि च] दाशुषे (=हविर्दात्रे यजमानाय) वृत्रं हन्ति (=हतवान्)। य [इन्द्रः] सूर्यस्य सातौ (=सूर्यस्य लाभे निमित्ते सति) पस्पृधानेभ्यः (=अहमेव प्रथमं सूर्यं प्राप्नुयामहमेव प्रथमं सूर्यं प्राप्नुयामिति परस्परमतिशयेन स्पर्धमानेभ्यो) नृभ्यः सद्यः (=तदानीमेव) अतसाय्यो भूत् (=समाश्रयणीयोभवत्) ॥

यदेन्द्रः सूर्यमजनयत् तदा तं सूर्यमहमेव प्रथमं प्राप्नुयामहमेव प्रथमं प्राप्नुयामिति मनुष्याः स्पर्धां चक्रुरिन्द्रं प्रति च एकस्मिन्नेव काले संजग्मिर इति भावः ॥

५. यत् (=यदा) एतशो [नाम कश्चिद् उपासको] दशस्यन् (=हविः प्रयच्छन् सन्) अस्मै (=तस्मा इन्द्राय) अंशं न (=पिता पुत्राय भागं प्रयच्छति तद्वत्) गुहदवद्यम् (=प्रच्छन्नदोषं=निर्दोषं) रयिं (=सोमरूपं धनम्) आ भरत् (=सम्पादयत्) [तदानीं] देवः (=दीप्तिमान्) स इन्द्रः स्तवान् (=स्तुतः सन्) मर्त्याय (=मरणधर्मणे) सुन्वते (=सोमम् अभिषुण्वते तस्मा एतशाय) सूर्यम् आ रिणक् (=वशमानयत्) ॥

स्तवान् आघोषकर्ता महानादकर्तेति पाश्चात्याः। सायणो नित्यं स्तुत इत्येव ॥

४. तो इंद्र मनुष्यांला अप्रतिम अशा पुष्कळ वस्तु देता झाला. तो हविर्दात्या उपासकासाठीं वृत्राला मारिता झाला. आणि सूर्य मिळण्यासाठीं [परस्पर] स्पर्धा करणारे जे मनुष्य ते एकदम त्याजकडेस धांवले.

4. That Indra gave many unequalled [things] to man [and] killed Vṛitra for the worshipper. And to him instantly crowded men who struggled to obtain the sun.

५. जेव्हां उपासक एतश वित्तांश [अर्पण केल्या]प्रमाणें निर्दोष [सोम]धन इन्द्राला अर्पण करिता झाला, तेव्हां तो देदीप्यमान इन्द्र स्तविला होत्साता सूर्याला त्या सोम अर्पण करणाऱ्या मर्त्य उपासकाच्या स्वाधीन करिता झाला.

5. Resplendent Indra, being praised, subjected the sun to Etas'a, the mortal soma-sacrificer, when he piously offered him the spotless [juicy] treasure like a portion [of his wealth].

---

४. 'सूर्य उत्पन्न केला तेव्हां तो मला अगोदर पाहिजे मला अगोदर पाहिजे अशी स्पर्धा करून सर्व मनुष्य इन्द्राकडे एकदम धांवले' असा उत्तरार्धाचा अभिप्राय आहे.

५. ही ऋचा जरी शब्दार्थाच्या संबंधानें सोपी आहे तरी 'एतश' याचें आख्यान काय आहे तें बरोबर समजत नसल्यामुळें भावार्थ कठिण आहे. परंतु सायण म्हणतात एतश नांवाच्या राजर्षीबरोबर सूर्य लढत असतां सूर्याला इंद्रानें हरविलें आणि एतशाचा जय केला. अशा कथेस अनुसरून अर्थ केला म्हणजे मंत्र लागतो, आणि आम्हीं तसाच लाविला आहे. ऋ. ८.१.११ यांत एतश नांवाचा राजर्षि सूर्याबरोबर लढत असतां इंद्रानें त्या संग्रामांत जाऊन एतशाला साहाय्य केलें असें सांगितलें आहे असा सायण तेथेंहि अर्थ करितात. ऋ. ६.१५.५ वरील भाष्यांतहि सायण एतशानें व सूर्यानें युद्ध झाल्याचें सांगतात. ऋ. ५.३१.११. यावरहि तसेंच समजून सायण भाष्य करितात. ऋ. ५.२९.५ यांत इंद्रानें एतशाशीं स्पर्धा करणाऱ्या सूर्याच्या घोड्या पुढें जात होत्या तरी मंदगति करून टाकिल्या असें सांगितलें आहे. ऋ. ४.३०.६ यांत इंद्रानें 'एतश' या मर्त्य ऋषीसाठीं सूर्याचा पराभव

स रन्धयत्सदिवः सारथये शुष्णमशुषं कुयवं कुत्साय ।
दिवोदासाय नवतिं च नवेन्द्रः पुरो व्यैरच्छम्बरस्य ॥ ६ ॥

सः । रन्धयत् । सऽदिवः । सारथये । शुष्णम् । अशुषम् । कुयवम् । कुत्साय ।
दिवःऽदासाय । नवतिम् । च । नव । इन्द्रः । पुरः । वि । ऐरत् । शम्बरस्य ॥ ६ ॥

एवा त इन्द्रोचथमहेम श्रवस्या न त्मना वाजयन्तः ।
अश्याम तत्साप्तमाशुषाणा ननमो वधरदेवस्य पीयोः ॥ ७ ॥

एव । ते । इन्द्र । उचथम् । अहेम । श्रवस्या । न । त्मना । वाजयन्तः ।
अश्याम । तत् । साप्तम् । आशुषाणाः । ननमः । वधः । अदेवस्य । पीयोः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. सदिवः (=दीप्तिमान्) स [इन्द्रः] अशुषं शुष्णं (=भक्षयितारं शुष्णं नाम शत्रुं) कुयवं [नाम शत्रुं] [च] सारथये कुत्साय रन्धयत् (=आत्मनः सारथ्यं कुर्वतः कुत्सस्य वशमानयत्) । इन्द्रो दिवोदासाय [नाम्नोपासकाय] शम्बरस्य नवतिं नव च पुरः (=नगराणि) वि ऐरत् (= विदारितवान्) ॥

७. हे इन्द्र, एवा (=एवं) वाजयन्तो न (=आजिधावनं कुर्वन्त इव) श्रवस्या (=श्रवस्यया धनेच्छया) ते उचथं (=तव स्तोत्रम्) अहेम (=रचयेम=रचितवन्तः स्मः) । आशुषाणाः (=त्वां भजमाना) [वयं] तत् (=प्रसिद्धं) [तव] साप्तम् अश्याम (=सप्तपुरुषसंबन्धिं सख्यं प्राप्नुयाम) । अदेवस्य (=देवरहितस्य) पीयोः (=शत्रोर्) वधः (=शस्त्रं) ननमः (=नमय) ॥

---

केला व तसें करून एतशाला रक्षिलें असें सांगितलें आहे तें प्रस्तुत ऋचेंत सांगितल्याप्रमाणेंच आहे. ऋ. ४.१७.१४ याजवरील भाष्यांत सायण अशी कथा सांगतात कीं, " स्वश्व नांवाचा एक राजा असे, त्याणें पुत्र होण्यासाठीं सूर्याची उपासना केली. सूर्यानें त्याचे पोटीं जन्म घेऊन एतश नांवाच्या महर्षींशीं युद्ध केलें तेव्हां एतशानें जयासाठीं इंद्राची स्तुति केली. तेव्हां इन्द्रानें एतशाचें त्या युद्धांत संरक्षण केलें." कसेंहि असो आणि एतश आणि सूर्य हे कोणिहि असोत, पण

६. तो दीप्तिमान् इंद्र सर्व-भक्षी शुष्णाला, [ आणि ] कुय-वाला सारथि कुत्साच्या अधिका-राखालीं आणिता झाला. इंद्र दि-वोदासासाठीं शंबराचीं नव्याण्णव नगरें विध्वंसिता झाला.

६. He the resplendent one brought the devouring S′ushṇa and Kuyava under the power of his fellow-charioteer Kutsa. Indra destroyed for Divodâsa the ninety-nine fortresses of S′ambara.

७. हे इंद्रा, या प्रकारेंकरून तुझें स्तोत्र धन जिंकण्याच्या इ-च्छेनें शर्यंत धांवणाऱ्या मनुष्यांप्र-माणें आम्हीं रचिलें आहे; [ तर] तुला भजणारे जे आम्ही त्या आ-म्हांस [ तुझें ] तें सात [पिढ्यां]चें [ सख्य ] प्राप्त होओ. देवहीन जो द्वेष्टा त्याचें शस्त्र तूं भंगून टाक.

7. Thus have we, o Indra, sung thy praise with a desire for reward like those that run a race. May we, [ therefore ], who serve thee, obtain [ thy ] well-known friendship of seven generations. Do thou bend the weapon of the godless hater.

---

एतश म्हणून कोणीएक व्यक्ति त्याला रक्षण्यासाठीं सूर्याला ( हा सूर्य कोणी असो ) इंद्रानें जिंकिलें अशी कथा प्राचीनकाळीं प्रसिद्ध असावी, आणि तिला अनुलक्षून सांप्रतच्या ऋचेंत ऋषीची उक्ति आहे असें समजलें पाहिजे. सू. ६१ मं. १५ पहा.

'वित्तांश [अर्पण केल्या]प्रमाणें.' म्हणजे पिता जसा पुत्राला आपल्या धनाचा अंश देतो त्याप्रमाणें, असें सायण म्हणतात. पण या उपमेचें तात्पर्य काय असेल तें चांगलें समजत नाहीं.

---

६. शुष्ण. सू.५१. मं.६ आणि सू.५६ मं. ३. कुयव सू. १०३ मं. ८ आणि सू. १०४ मं. ३. आणि कुत्साविषयीं. सू. ५१ मं. ६ हे पहा.

दिवोदासाविषयीं सू.११२ मं. १४ आणि शंबराविषयीं सू. ५१ मं. ६ आणि टीप पहा.

७. 'शर्यंत धांवणारा मनुष्य ज्या उत्कंठेनें धांवतो त्या उत्कंठेनें आम्ही धन मिळावें म्हणून इन्द्राचें हें स्तोत्र केलें आहे. तर आमच्या सात पिढ्यांपासून चालत आलेलें जें इंद्राबरोबरचें सख्य, तें आम्हांस प्राप्त होओ; इंद्र नास्तिक शत्रूंचा पाडाव करो.' असा या ऋचेचा भावार्थ दिसतो.

'सात [पिढ्यां]चें सख्य '= ' साप्तम्'.

**एवा ते गृत्समदाः शूर मन्मावस्यवो न वयुनानि तक्षुः ।**
**ब्रह्मण्यन्त इन्द्र ते नवीय इषमूर्जं सुक्षितिं सुम्नमश्युः ॥ ८ ॥**

एव । ते । गृत्सऽमदाः । शूर । मन्म । अवस्यवः । न । वयुनानि । तक्षुः ।
ब्रह्मण्यन्तः । इन्द्र । ते । नवीयः । इषम् । ऊर्जम् । सुऽक्षितिम् । सुम्नम् । अश्युः ॥ ८ ॥

**नूनं सा ते प्रति वरं जरित्रे दुहीयदिन्द्र दक्षिणा मघोनी ।**
**शिक्षा स्तोतृभ्यो माति धग्भगो नो बृहद्वदेम विदथे सुवीराः॥९॥२४**

नूनम् । सा । ते । प्रति । वरम् । जरित्रे । दुहीयत् । इन्द्र । दक्षिणा । मघोनी ।
शिक्ष । स्तोतृऽभ्यः । मा । अति । धक् । भगः । नः । बृहत् । वदेम । विदथे । सुऽवीराः ॥ ९ ॥ २४ ॥

---

## भाषायाम्.

८. एवा (=अनेन प्रकारेण) हे शूर, अवस्यवो गृत्समदाः (=तव प्रसादमिच्छन्तो गृत्समदपुत्रास्) ते मन्म वयुनानि न तक्षुः (=स्तोत्रं यजनरूपकर्माणि च त्वदर्थं चक्रुः)। [अतो] हे इन्द्र, ब्रह्मण्यन्तः (=स्तोत्रं कर्तुमिच्छन्तः भावयुक्तास्ते) ते इषम् ऊर्जं सुक्षितिं सुम्नं (=तव त्वया दत्तम् अन्नं बलं शोभनं निवासं सुखं च) नवीयः (=नूतनतरं=यथा तेषां पूर्वं प्रापुस्तद्वत्तेप्यधुना) अश्युः (=प्राप्नुयुः)॥

तक्षुः। ततक्षुः। चक्रुः।.तत्र दृष्टान्तः। अवस्यवो न। ......अवो गमनमिच्छन्तः पुमांसो वयुनानि मार्गान् यथा कुर्वन्ति तद्वत्। इति सायणः॥

९. हे इन्द्र, नूनम् (=इदानीं) ते (=तव) मघोनी (=धनवती) सा (=प्रसिद्धा) दक्षिणा जरित्रे (=स्तोत्रे) वरं (=मनोभिलाषं) प्रति दुहीयत् (=संपादयेत्)। भगः (=दाता त्वं) नः स्तोतृभ्यः (=अस्मभ्यं स्तोत्रकर्तृभ्यः) शिक्ष (=देहि) माति धक् (=मातिक्रम=प्रथममस्मभ्यं दत्त्वा पश्चादन्येभ्यो देहि)। सुवीराः (=शोभनवीर्योपेतैः पुत्रैः सहिताः सन्तो) विदथे (=यज्ञे) बृहत् (=महत् स्तोत्रं) वदेम (=त्वामुद्दिश्य ब्रवाम)॥

८. याप्रमाणें हे शूर इन्द्रा, प्रसादेच्छु गृत्समद तुजसाठीं स्तोत्र आणि उपासना करिते झाले आहेत. [ तर ] हे इंद्रा, भक्तिमंत [ गृत्समद ]* तुझें जें अन्न, बळ, चांगलें घर [ आणि ] सुख त्याप्रत पुनः पावोत.

९. आतां हे इंद्रा, तुझी जी धनसमृद्ध प्रख्यात दक्षिणा ती स्तोत्याची मनकामना पूर्ण करो. स्तोत्यांला दे, तूं उदार आम्हांस वगळूं नको. चांगल्या वीरांनीं युक्त होत्साते आम्ही यज्ञांत तुझी मोठी कीर्ति गाऊं असें कर.

8. Thus have the Gritsamadas, desirous of [thy] favour, made for thee, o brave one, praise and worship. May the pious [Gritsamadas] again obtain, o Indra, the food, the strength, the good home and the comfort that thou givest.

9. Now, Indra, may thy rich bounty fulfil the desire of the poet. Give to us the poets, do not pass us over, thou the liberal one. May we, accompanied by brave sons, sing great praises [ to thee ] in sacrifices.

---

हा शब्द पुनः ऋग्वेदसंहितेंत आला नसल्यामुळें येथें सायणानुसारें दिलेल्या अर्थास प्रयोगान्तराची बळकटी मिळत नाहीं. ' देवहीन द्वेष्टा ' म्हणून जो यांत सांगितला आहे, तो आर्य लोकांबरोबर लढणारे जे कर्महीन काळे लोक तद्रूप होय. पुढच्या सूक्ताची सातवी आणि आठवी ह्या ऋचा पहा.

---

८. ' गृत्समद' म्हणजे हें सूक्त ज्याणें रचिलें तो आणि त्याचे पुत्रादिक.

' स्तोत्र आणि उपासना ' = ' मन्म वयुनानि न.' ' न ' शब्दाचा येथें केलेला 'आणि' हा अर्थ सायणाचार्य जरी केव्हां-केव्हां करितात, तरी निदान याजागीं आम्हांस त्याविषयीं संशय आहे.

' पुनः '=' नवीयः'. म्ह. आमच्या वाडवडिलांस पूर्वी जशी या वस्तूंची प्राप्ति झाली तशी आम्हांलाहि आतां होओ.

* तुझें '= ' ते.' म्ह. तूं जें उपासकास देत असतोस तें.

## सूक्तम् २०-२११.

गृत्समद ऋषिः । इन्द्रो देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**वयं ते वय इन्द्र विद्धि षु णः प्र भरामहे वाजयुर्न रथम् ।**
**विपन्यवो दीध्यतो मनीषा सुम्नमियक्षन्तस्त्वावतो नॄन् ॥ १ ॥**

वयम् । ते । वयः । इन्द्र । विद्धि । सु । नः । प्र । भरामहे । वाजऽयुः । न । रथम् ।
विपन्यवः । दीध्यतः । मनीषा । सुम्नम् । इयक्षन्तः । त्वाऽवतः । नॄन् ॥ १ ॥

**त्वं न इन्द्र त्वाभिरूती त्वायतो अभिष्टिपासि जनान् ।**
**त्वमिनो दाशुषो वरूतेत्थाधीरभि यो नक्षति त्वा ॥ २ ॥**

त्वम् । नः । इन्द्र । त्वाभिः । ऊती । त्वाऽयतः । अभिष्टिऽपा । असि । जनान् ।
त्वम् । इनः । दाशुषः । वरूता । इत्थाऽधीः । अभि । यः । नक्षति । त्वा ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, वयं वाजयुर्न रथं (=जयमिच्छन् रथं प्रेरयति तद्वत्) ते वयः प्र भरामहे (=त्वदर्थं हविरन्नं प्रकर्षेण संपादयामः) । [अतस्त्वं] नः सु विद्धि (=अस्मान् सम्यग् जानीहि=अनुगृहाण) । विपन्यवः (=तव स्तोत्रं कुर्वाणा) मनीषा दीध्यतः (=मनीषया स्तुत्या ध्यानं कुर्वन्तस्) त्वावतो नॄन् सुम्नम् इयक्षन्तः (=त्वत्सदृशान् अग्न्यादीन् शूरान् धनं याचमाना) [वयं वयः प्रभरामहे] ॥

२. हे इन्द्र, त्वं त्वाभिः (=त्वत्संबन्धिनीभिर्) ऊती (=ऊतिभिः=रक्षणोपायैर्) नः (=अस्मान्) त्वायतो जनान् (=त्वत्कामान् मनुष्यांश्च) अभिष्टिपा असि (=शत्रोः पालयिता भवसि) । त्वं यस्त्वाम् अभि नक्षति (=गच्छति) [तस्य] दाशुषः (=हविर्दत्तवतो यजमानस्य) इनः (=स्वामी) इत्थाधीर्वरूता(=सत्यकर्मा पालयिता) [च भवसि] ॥

अभिष्टी पासि जनान् इति पाठं रक्षणेन जनान् पालयसीति च तस्य विवरणं कर्तुमिच्छति भास्मानः ॥

## सूक्त २०-२११.

ऋषि-गृत्समद. देवता-इंद्र. वृत्त-त्रिष्टुभ्.

१. हे इंद्रा, धनार्थी [मनुष्य] जसा रथाला [हाकितो] त्याप्रमाणें आम्हीं हें हविरन्न तुला अर्पण केलें आहे, तर तूं आम्हांवर चांगली कृपा कर. स्तोत्र करणारे, भक्तीनें ध्यान करणारे, आणि तुझ्या सारिख्या शूरांजवळ धन मागणारे जे आम्हीं त्या आम्हीं हें [ हविरन्न तुला अर्पण केलें आहे ].

२. हे इंद्रा, तूं आमचा [आणि ] तुझी भक्ति करणाऱ्या जनाचा तुझ्या रक्षणोपायांनीं शत्रूंपासून पाळण करणारा आहेस. तूं, जो तुला शरण जातो, त्या हविर्दात्या उपासकाचा स्वामी आणि मनःपूर्वक रक्षण करणारा आहेस.

## Hymn 20-211.

To *Indra*. By *Gṛitsamada*. Metre—*Trishṭubh*.

1. We have brought, o Indra, [ this ] offering to thee even as one desirous of winning [ drives ] his chariot; regard us with kindness: we, who are prayerful, who contemplate with devotion and implore the blessing of heroes like thee.

2. Thou, o Indra, art a preserver from enemies of us, and of men who love thee, with thy protections. Thou art the master and the true saviour of that sacrificer who goes to thee.

---

१. यांत जी उपमा दिली आहे तिचा अभिप्राय असा दिसतो कीं, 'धन जिंकण्यासाठीं अथवा जय मिळविण्यासाठीं जसे पुष्कळ जण रथ मोठ्या त्वरेनें हाकितात, आणि त्यांतून प्रत्येक जण दुसऱ्याला जय न मिळतां आपणाला मिळावा असें इच्छितो, त्याप्रमाणें आम्हीं इतर उपासकांबरोबर हवि अर्पण करीत आहों. तर इतर उपासकांवर प्रसाद न करितां आम्हांवरच कर; दुसऱ्यांवर करूं नको.'

**स नो युवेन्द्रो जोहूत्रः सखा शिवो नरामस्तु पाता ।**
**यः शंसन्तं यः शशमानमूती पचन्तं च स्तुवन्तं च प्रणेषत् ॥३॥**

सः । नः । युवा । इन्द्रः । जोहूत्रः । सखा । शिवः । नराम् । अस्तु । पाता ।

यः । शंसन्तम् । यः । शशमानम् । ऊती । पचन्तम् । च । स्तुवन्तम् । च । प्रऽनेषत् ॥ ३ ॥

**तमु स्तुष इन्द्रं तं गृणीषे यस्मिन्पुरा वावृधुः शाशदुश्च ।**
**स वस्वः कामं पीपरदियानो ब्रह्मण्यतो नूतनस्यायोः ॥ ४ ॥**

तम् । ऊं इति । स्तुषे । इन्द्रम् । तम् । गृणीषे । यस्मिन् । पुरा । ववृधुः । शाशदुः । च ।

सः । वस्वः । कामम् । पीपरत् । इयानः । ब्रह्मण्यतः । नूतनस्य । आयोः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. यः शंसन्तं (=शस्त्राणि शंसन्तं) शशमानं (=क्रियाः कुर्वाणं) पचन्तं (=चरुपुरोडाशादिकं संस्कुर्वन्तं च) स्तुवन्तं च (=स्तोत्रं कुर्वाणं च) [जनम्] ऊती (=स्वकीयेन रक्षणोपायेन) प्रणेषत् (=प्रकर्षेण पारं नयेत्) स युवा (=सदा तरुणो) जोहूत्रः (=स्तोतृभिराह्वातव्यः) शिवः सखा (=कल्याणो मित्रभूतो) नो नरां पातास्तु (=अस्माकं वीराणां पालयिता भवतु)॥

४. तमु (=तमेव) स्तुषे (=स्तौमि) तम् इन्द्रं गृणीषे (=तमेवेन्द्रं शंसामि) यस्मिन् पुरा (=पुरातनकाले) [जना] वावृधुः शाशदुश्च (=बलवन्तो बभूवुः विजयं प्रापुश्च)। स [इन्द्र] इयानः (=स्तुतः सन्) नूतनस्य ब्रह्मण्यत आयोः (=इदानींतनस्य स्तोत्राद्युपासनाकर्तुर्मनुष्यस्य) वस्वः कामं (=धनसंबन्धिनमभिलाषं) पीपरत् (=पूरयतु)॥

३. जो स्तोत्याला,[उपासना]. कर्म कर्त्याला, आणि पाक करणाऱ्याला आणि स्तुति करणाऱ्याला पार नेतो, तो सदा तरुण [आणि] आह्वानयोग्य [ आणि ] कल्याणी सखा इंद्र आमच्या जनांचा त्राता होओ.

४. त्यालाच मी स्तवितों, त्याच इंद्राला मी आळवितों, कीं ज्याच्या ठायीं पुरातन काळीं[लोक] बळवान् झाले आणि विजय पावले. तो स्तविला होत्साता नूतन उपासक मनुष्याची धनाविषयींची इच्छा पूर्ण करो.

3. May that Indra be the saviour of our people, who is an ever young and beneficent friend deserving to be invoked, who promotes with his protection him who implores, him who works, and him who cooks, and him who praises.

4. That very one I praise, that Indra I propitiate, in whom [people] became strong and triumphed in ancient times. Being praised may he fulfil the desire for wealth of the modern worshipping man.

---

३. 'पाक करणाऱ्याला'='पचन्तम्.' म्ह. पुरोडाशादि शिजविणाऱ्याला.

४. 'ज्याच्या ठायीं'='यस्मिन्.' म्ह. ज्याच्या मुळें असा अर्थ.

सो अङ्गिरसामुचथा जुजुष्वान्ब्रह्मा तूतोदिन्द्रो गातुमिष्णन् ।
मुष्णन्नुषसः सूर्येण स्तवानश्नस्य चिच्छिश्नथत्पूर्व्याणि ॥५॥२५॥

सः । अङ्गिरसाम् । उचथा । जुजुष्वान् । ब्रह्म । तूतोत् । इन्द्रः । गातुम् । इष्णन् ।
मुष्णन् । उषसः । सूर्येण । स्तवान् । अश्नस्य । चित् । शिश्नथत् । पूर्व्याणि ॥ ५ ॥ २५ ॥

स ह श्रुत इन्द्रो नाम देव ऊर्ध्वो भुवन्मनुषे दस्मतमः ।
अव प्रियमर्शसानस्य साह्वाञ्छिरो भरद्दासस्य स्वधावान् ॥ ६ ॥

सः । ह । श्रुतः । इन्द्रः । नाम । देवः । ऊर्ध्वः । भुवत् । मनुषे । दस्मऽतमः ।
अव । प्रियम् । अर्शसानस्य । सह्वान् । शिरः । भरत् । दासस्य । स्वधाऽवान् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. स इन्द्रः अङ्गिरसाम् उचथा ( =उचथानि स्तोत्राणि ) जुजुष्वान् ( =सेवितवान् ) गातुम् इष्णन् ( =स्तोत्रं श्रेयांसि प्रति प्रापयन् सन् ) ब्रह्म तूतोत् ( =उपासनाकर्म प्रावर्धयत् ) । स्तवान् ( =स्तुतः सन् ) सूर्येणोषसो मुष्णन् ( =सूर्येण उषसोपहरन् ) [ स इन्द्रः ] अश्नस्य चित् पूर्व्याणि [ पुराणि ] ( =अश्ननामकस्य कस्यचिद् असुरस्यापि पुरातनानि नगराणि ) शिश्नथत् ( =अश्नथयत्=हिंसितवान् ) ॥

६. श्रुतः ( =प्रख्यातो ) देवः (=दीप्तो ) दस्मतमः (=अतिशयेन पराक्रमकारी ) स इन्द्रो मनुषे ( =मनुष्यार्थम् ) ऊर्ध्वो भुवत् ( =रक्षणसिद्धो भवतु ) । साह्वान् ( =शत्रुजित् ) स्वधावान् ( =बलवान् ) [ इन्द्रः ] अर्शसानस्य ( = हिंसाद्यभियुक्तस्य ) दासस्य ( =दस्योः=अनार्यजनस्य ) प्रियं शिरः अव भरत् (=भूमौ पातयतु)॥

५. तो इंद्र अंगिरसांचीं स्तवनें सेवून स्तोत्राचा उत्कर्ष करिता झाला आणि उपासनाकर्मांची वृद्धि करिता झाला. तो स्तविला होत्साता सूर्याच्या योगानें उषांचें अपहरण करिता झाला. तो अश्नाचींहि अनेक [ नगरें ] विध्वंसिता झाला.

5. That Indra, having enjoyed the hymns of the Angirases, strengthened the worship, promoting the sacred song. Being praised he destroyed the Ushases by means of the sun and shattered the ancient cities of even As'na.

६. तो देदीप्यमान, प्रख्यात [आणि] अत्यंत पराक्रमी इंद्र मनुष्याला साहाय्य करण्यासाठीं सिद्ध असो. विजयी आणि बळवान् इंद्र नाशक अनार्यांचें प्रिय शिर भूमीवर पाडो.

6. May that Indra, renowned, resplendent and most victorious be ready with help for man. May overpowering [ and ] mighty [ Indra ] bring down the dear head of the mischievous un-Âryan.

---

५. 'अंगिरसांनीं केलेली स्तुति ऐकून स्तोत्र आणि उपासना करण्याचा जो मार्ग तो इंद्रानें पुनः संस्थापिला. इंद्रानें उषा नाहींशा केल्या आणि अश्न या असुराचीं नगरें फोडिलीं.'

'अंगिरस.' सू. ३१ मं. १,१७.

'उषा नाहींशा केल्या.' सू. २०६ मं. ६ ऋ. ४. ३०. ८-११

'अश्न.' सू.२०५. मं. ५ पहा. ऋ.६. ४.३ यांतहि अश्नाचीं नगरें फोडिलीं असें सांगितलें आहे.

६. 'नाशक अनार्यांचें' = 'अर्शसानस्य दासस्य.' म्हणजे नाश करणारा जो कोळी वगैरे अनार्यरूप शत्रु त्याचें. यांत इंद्रानें अनार्य लोकांचा पाडाव करावा आणि आर्य लोकांचा जय करावा अशी प्रार्थना आहे. ऋ. ६.१२.९ ऋ. १०. ९९.७ आणि सू. १३० मं. ८ आणि टीप पहा.

स वृत्रहेन्द्रः कृष्णयोनीः पुरंदरो दासीरैरयद्वि ।
अजनयन्मनवे क्षाममपश्च सत्रा शंसं यजमानस्य तूतोत् ॥ ७ ॥
सः । वृत्रऽहा । इन्द्रः । कृष्णऽयोनीः । पुरम्ऽदरः । दासीः । ऐरयत् । वि ।
अजनयत् । मनवे । क्षाम् । अपः । च । सत्रा । शंसम् । यजमानस्य ।
तूतोत् ॥ ७ ॥

तस्मै तवस्य१मनु दायि सत्रेन्द्राय देवेभिरर्णसातौ ।
प्रति यदस्य वज्रं बाह्वोर्धुर्हत्वी दस्यून्पुर आयसीर्नि तारीत् ॥ ८॥
तस्मै । तवस्यम् । अनु । दायि । सत्रा । इन्द्राय । देवेभिः । अर्णऽसातौ ।
प्रति । यत् । अस्य । वज्रम् । बाह्वोः । धुः । हत्वी । दस्यून् । पुरः ।
आयसीः । नि । तारीत् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. वृत्रहा (=वृत्रस्य हन्ता ) पुरंदरः (=पुराणां नगराणां विदारयिता ) स इन्द्रः कृष्णयोनीर्दासीः (=कृष्णजातीरनार्यप्रजा ) वि ऐरयत् (=विविधम् ऐरयत् व्यनुदत्=इतस्ततो व्यनाशयत् ) । स मनवे आर्यजनाय क्षाम् अपश्च (=पृथिवीम् उदकानि च ) अजनयत् [ स ] सत्रा (=सदैव ) यजमानस्य शंसं ( =यजनकर्तुः स्तोत्रं) तूतोत् (= वर्धयतु ) ॥

८. सत्रा ( =संततम् ) अर्णसातौ ( =संग्रामे ) देवेभिस्तस्मा इन्द्राय तवसम् अनु दायि ( =देवैस्तस्मा इन्द्राय बलम् अनुध्रियते=तस्मादिन्द्रात् पश्चाद्देवैर्बलं ध्रियते =देवानां बलादस्य बलं गरीयो भवति ) । यत् ( =यदा ) अस्य बाह्वोर्वज्रं प्रति धुः ( =निदधुः ) [ स्तोतारः ? ], [ तदानीं स ] दस्यून् हत्वी ( =अनार्यान् शत्रून् हत्वा ) आयसीः पुरः ( =अयोमयीस्तेषां पुरो ) नि तारीत् ( =नितरामनाशयत् )॥

७. तो वृत्रघ्न [आणि] पुरभंजक इंद्र अनार्य काळ्या जातीच्या लोकांची दाणादाण करिता झाला. तो [आर्य]जनाकरितां पृथिवी आणि उदकें निर्माण करिता झाला. तो यजन करणाऱ्या जनाचें स्तोत्र सदैव वाढवो.

7. That Indra, the killer of Vritra and the shatterer of the fortresses, dispersed the non-Âryan races of the black origin. He created the earth and the waters for [the Âryan] man. May he always promote the hymn of the sacrificer.

८. त्या इंद्राचें बळ युद्धांत [इतर] देवांच्या बळापेक्षां सदैव श्रेष्ठ असतें. त्याच्या खांद्यांवर जेव्हां [स्तोते जन] वज्र ठेविते झाले, [तेव्हां तो] दस्यूंला मारून [त्यांचीं] लोखंडी नगरें जमीनदोस्त करिता झाला.

8. The power of that Indra is ever superior in battle to that of [all] the gods. When they placed the thunderbolt on his shoulders, he killed the Dasyus and smashed their iron forts.

---

७. यांतहि, आर्यजनाचें कोळी भिल्ल इत्यादि काळ्या अनार्य जनांवर वर्चस्व आहे व इंद्र तें सदैव राखो, अशी इंद्राला प्रार्थना आहे. ह्यांत काळे लोक सांगितले त्याविषयीं. सू. १०३ मं. ३ यांतील दस्यु शब्दावरची टीप पहा.

८. 'इतर देवांच्या बळापेक्षां सदैव श्रेष्ठ असतें'=' देवेभिस्तस्मै तवसम् अनु दायि.' येथें 'अनुदा' या धातूचा अर्थ 'अनुज्ञा'च्या अर्थासारिखा होतो. ऋ. ८.६२.७ आणि त्यावरील सायणभाष्य पहा. शिवाय सू.२०३ मं. १० आणि टीप पहा.

'खांद्यावर वज्र ठेविते झाले'='वज्रं बाह्वोर्धुः.' म्हणजे स्तोत्यांनीं स्तोत्र केल्यावरून इंद्रानें प्रसन्न होऊन जेव्हां वज्र आपल्या खांद्यावर घेतलें तेव्हां.

'दस्यूंला.' म्हणजे अनार्य जे शत्रु त्यांला.

'लोखंडी नगरें'='आयसीः पुरः'. म्हणजे लोखंडासारिखे गांवाचे आवार अथवा गांवकुसें.

नूनं सा ते प्रति वरं जरित्रे दुहीयदिन्द्र दक्षिणा मघोनी ।
शिक्षा स्तोतृभ्यो माति धग्भगो नो बृहद्वदेम विदथे सुवीराः॥९॥२६

नूनम् । सा । ते । प्रति । वरम् । जरित्रे । दुहीयत् । इन्द्र । दक्षिणा । मघोनी ।
शिक्ष । स्तोतृऽभ्यः । मा । अति । धक् । भगः । नः । बृहत् । वदेम । विदथे । सुऽवीराः ॥ ९ ॥ २६ ॥

## भाषायाम्.

९. हे इन्द्र, नूनम् (=इदानीं) ते (=तव) मघोनी (=धनवती) सा (=प्रसिद्धा) दक्षिणा जरित्रे (=स्तोत्रे) वरं (=मनोभिलाषं) प्रति दुहीयत् (=संपादयेत्) । भगः (=दाता त्वं) नः स्तोतृभ्यः (=अस्मभ्यं स्तोत्रकर्तृभ्यः) शिक्ष (=देहि) माति धक् (=मातिक्रम=प्रथममस्मभ्यं दत्त्वा पश्चादन्येभ्यो देहि) । सुवीराः (=शोभनवीर्योपेतैः पुत्रैः सहिताः सन्तो) विदथे (=यज्ञे) बृहत् (=महत् स्तोत्रं) वदेम (=त्वामुद्दिश्य ब्रवाम) ॥

---

## सूक्तम् २१–२१२.

गृत्समद ऋषिः । इन्द्रो देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

विश्वजिते धनजिते स्वर्जिते सत्राजिते नृजित उर्वराजिते ।
अश्वजिते गोजिते अब्जिते भरेन्द्राय सोमं यजताय हर्यतम् ॥१॥

विश्वऽजिते । धनऽजिते । स्वःऽजिते । सत्राऽजिते । नृऽजिते । उर्वराऽजिते ।
अश्वऽजिते । गोऽजिते । अप्ऽजिते । भर । इन्द्राय । सोमम् । यजताय । हर्यतम् ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. [हे अध्वर्यो], विश्वजिते (=सर्वेषां जेत्रे) धनजिते (=धनस्य जेत्रे) स्वर्जिते (=स्वर्गस्य जेत्रे) सत्राजिते (=महतां जेत्रे) नृजिते (=शूराणां जेत्रे) उर्वराजिते (=सस्याढ्यानां क्षेत्राणां जेत्रे) अश्वजिते (=अश्वानां जेत्रे) गोजिते (=गवां

९. आतां हे इंद्रा, तुझी जी धनसमृद्ध प्रख्यात दक्षिणा ती स्तोत्याची मनकामना पूर्ण करो. स्तोत्यांला दे, तूं उदार आम्हांस वगळूं नको. चांगल्या वीरांनीं युक्त होत्साते आह्मी यज्ञांत तुझी मोठी कीर्ति गाऊं असें कर.

9. Now, Indra, may thy rich bounty fulfil the desire of the poet. Give to us the poets, do not pass us over, thou the liberal one. May we, accompanied by brave sons, sing great praises [ to thee ] in sacrifices.

## सूक्त २१-२१२.

ऋषि-गृत्समद. देवता-इन्द्र. वृत्त-त्रिष्टुभ्.

१. [ हे अध्वर्यू ], सर्व जिंकणारा, धन जिंकणारा, स्वर्ग जिंकणारा, मोठमोठ्यांला जिंकणारा, शूरांस जिंकणारा, क्षेत्र जिंकणारा, घोडे जिंकणारा गाई जिंकणारा, उदकें जिंकणारा, असा जो पूज्य इन्द्र त्याला तूं रमणीय सोम अर्पण कर.

## Hymn 21-212.

To *Indra.* By *Gṛitsamada.* Metre-*Trishṭubh.*

1. Offer the delicious soma to adorable Indra, the conqueror of all, the conqueror of wealth, the conqueror of heaven, the conqueror of the great, the conqueror of heroes, the conqueror of fruitful fields, the conqueror of horses, the conqueror of cows, the conqueror of the waters.

---

१. 'धन जिंकणारा'=' धनजित्.' म्हणजे शत्रूंस मारून त्यांचें धन हरण करून घेणारा. 'क्षेत्र जिंकणारा'=' उर्वराजित्.' जिजमध्यें धान्य पिकतें तसल्या जमिनीला 'उर्वरा' असें नांव आहे. अनार्यलोक जे पूर्वी या देशांत असत त्यांचीं शेतें काढून घेऊन आर्यलोकांस देणारा असें 'उर्वराजित्' या विशेषणाचें तात्पर्य आहे.

उदकें म्हणजे वृत्रानें आवरून धरिलेलीं जीं तीं.

अभिभुवेऽभिभङ्गाय वन्वतेऽषाह्लाय सहमानाय वेधसे ।
तुविग्रये वह्नये दुष्टरीतवे सत्रासाहे नम इन्द्राय वोचत ॥ २ ॥
अभिऽभुवे । अभिऽभङ्गाय । वन्वते । अषाह्लाय । सहमानाय । वेधसे ।
तुविऽग्रये । वह्नये । दुस्तरीतवे । सत्राऽसहे । नमः । इन्द्राय । वोचत ॥२

सत्रासाहो जनभक्षो जनंसहश्च्यवनो युध्मो अनु जोषमुक्षितः ।
वृतंचयः सहुरिर्विक्ष्वारित इन्द्रस्य वोचं प्र कृतानि वीर्या ॥ ३ ॥
सत्राऽसहः । जनऽभक्षः । जनम्ऽसहः । च्यवनः । युध्मः । अनु ।
जोषम् । उक्षितः ।
वृतम्ऽचयः । सहुरिः । विक्षु । आरितः । इन्द्रस्य । वोचम् । प्र । कृतानि । वीर्या ॥ ३ ॥

---

जेत्रे ) अब्जिते ( =उदकानां मेघस्थानां जेत्रे ) यजताय ( =यजनीयाय=पूजनीयाय ) इन्द्राय हर्यतं ( =रमणीयं=माधुर्येण हर्षकारकं ) सोमं भर ( =आनय =अर्पय ) ॥

---

## भाषायाम्.

२. [ हे ऋत्विजः ], अभिभुवे ( =सर्वस्याभिभवित्रे ) अभिभङ्गाय ( =असुराणां भञ्जकाय ) वन्वते ( =जेत्रे ) अषाह्लाय ( =शत्रुभिरनभिभूताय ) सहमानाय ( =सर्वसहाय ) वेधसे ( =प्राज्ञाय ) तुविग्रये ( =बहुस्तुताय ) दुस्तरीतवे सत्रासहे वह्नये ( =दुस्तरणीयाय महतां जेत्रे नायकभूताय ) इन्द्राय नमो वोचत (=स्तोत्रं ब्रूत ) ॥

३. सत्रासहः ( =महतामप्यभिभविता ) जनभक्षः ( =जनेभ्यः संभजनीयो ) जनंसहः ( =बलिनां जनानाम् अभिभविता ) च्यवनः ( =शत्रूणां च्यावयिता ) युध्मः ( =योधनशीलः ) अनु जोषम् उक्षितः (=स्वेच्छामनुसृत्य वर्धितो ) वृतंचयः (=शत्रोर्हिंसिता ) सहुरिः ( =शत्रूणां सोढा ) [ एतादृश इन्द्रो ] विक्षु आरितः ( =जनेषु रक्षणाय प्राप्तः=शरणाय प्राप्तो भवति=तस्य शरणं प्राप्नुवन्ति ) । [ तस्य ] इन्द्रस्य कृतानि (=चरितानि)-वीर्या (=वीर्याणि=शूरकर्माणि) [च] प्र वोचं (=प्रकर्षेण ब्रवीमि) ॥

२. [ शत्रूचा ] उपमर्द करणारा, भंजक, विजयी, अजिंक्य, जयशील, प्राज्ञ, ज्याचें बहुत लोक स्तोत्र करितात असा, नायक, दुस्तर, मोठ्यांलाहि जिंकणारा, असा जो इंद्र त्याप्रीत्यर्थ स्तोत्र म्हणा.

३. मोठ्यांलाहि जिंकणारा, जनसेव्य, जनजेता, *हालविणारा, युद्धशील, मनाप्रमाणें वाढविलेला, शत्रूचा पाडाव करणारा, महा बलवान् असा जो इंद्र त्याला लोकांत शरण जातात. त्या.इंद्राचीं चरितें आणि पराक्रम मी गातों.

2. Chant a hymn in honour of Indra [who is] overpowering, conquering, victorious, irresistible, strong, wise, praised by many, an invincible [and] mighty leader.

3. He who is the vanquisher of the great; the object of peoples' worship, who vanquishes the people, who over-throws his enemies, who is warlike; [and] strengthened according to his desire, the destroyer of the enemy, and the overpowering, is resorted to among the people. I will proclaim the achievements and the brave exploits of Indra.

---

२. वरच्या मंत्राप्रमाणें यांतहि इंद्राचीं कितीएक विशेषणें आहेत याशिवाय यांत कांहीं विशेष नाहीं.

३. ' मनाप्रमाणें वाढविलेला '='अनु जोषम् उक्षितः'. म्हणजे त्याची तृप्ति होईपर्यंत स्तोत्रांनीं आणि सोमांनीं प्रबळ केलेला.

अनानुदो वृषभो दोधतो वधो गम्भीर ऋष्वो असमष्टकाव्यः ।
रध्रचोदः श्नथनो वीळितस्पृथुरिन्द्रः सुयज्ञ उषसः स्वर्जनत् ॥४॥
अनानुऽदः । वृषभः । दोधतः । वधः । गम्भीरः । ऋष्वः । असमष्टऽकाव्यः ।
रध्रऽचोदः । श्नथनः । वीळितः । पृथुः । इन्द्रः । सुऽयज्ञः । उषसः । स्वः । जनत् ॥ ४ ॥

यज्ञेन गातुमप्तुरो विविद्रिरे धियो हिन्वाना उशिजो मनीषिणः ।
अभिस्वरा निषदा गा अवस्यव इन्द्रे हिन्वाना द्रविणान्याशत॥५॥
यज्ञेन । गातुम् । अप्ऽतुरः । विविद्रिरे । धियः । हिन्वानाः । उशिजः । मनीषिणः ।
अभिऽस्वरा । निऽसदा । गाः । अवस्यवः । इन्द्रे । हिन्वानाः । द्रविणानि । आशत ॥ ५ ॥

## भाषायाम्.

४. अनानुदः ( =प्रभूतदानेन नास्ति समानो यस्य तादृशो ) वृषभः ( =वीरो ) दोधतो वधः ( =हिंसकस्य शत्रोर्हन्ता ) गम्भीरः ऋष्वः ( =महान् ) असमष्टकाव्यः ( =अन्यैरप्राप्तकौशलो ) रध्रचोदः ( =समृद्धानां प्रेरकः ) श्नथनः ( =शत्रूणां बलापहारेण शातयिता ) वीळितः ( =दृढाङ्गः ) पृथुः ( =जगद्व्याप्य वर्तमानः ) सुयज्ञः ( =शोभना यज्ञाः सन्ति यस्य स ) इन्द्रः उषसः स्वर्जनत् ( =उषसश्च सूर्यं च उदपादयत् ) ॥

५. उशिजः ( =इन्द्रं कामयमाना ) मनीषिणः ( =मेधाविनः ) [ अङ्गिरआदय उपासका ] धियो हिन्वानाः ( =कर्माणि प्रेरयन्तः कुर्वन्तः ) अप्तुरः ( =उदकानां प्रेरयितुरिन्द्राद् ) यज्ञेन गातुं विविद्रिरे ( =कल्याणं लेभिरे ) । अवस्यवः ( =प्रसादेच्छवस् ) [ ते ] गा इन्द्रे हिन्वानाः ( =गोरसरूपाणि हवींषीन्द्रे प्रेरयन्तः ददतः सन्तः ) अभिस्वरा निषदा (=स्तोत्रेण तथोपासनया) द्रविणानि आशत (=धनानि प्राप्नुवन् ) ॥

मेधाविनोऽङ्गिरसः ...... गाः स्तुतीः । इति सायणः ॥

४. अनुपम वीर, नाशकाचा संहर्ता, गंभीर, महान्, अनन्यप्राप्तकौशल, समृद्धांचा प्रेरक, शत्रूंचा नाश करणारा, बळकट, विश्वव्यापी [ आणि ] सुयज्ञ असा जो इंद्र, तो उषांला आणि सूर्याला उत्पन्न करिता झाला.

५. [ इन्द्र]कामी [ आणि ] विद्वान् [ उपासक ] उपासना करणारे [होत्साते] यज्ञाच्या योगानें उदकप्रेरका [ इंद्रा]पासून कल्याणाप्रत पावले. प्रसादेच्छु उपासक इंद्राला हव्यें अर्पण करून स्तोत्राच्या योगानें आणि उपासनेच्या योगानें संपत्तींप्रत पावले.

4. Indra the matchless hero, the destroyer of the mischievous, deep, great, and of skill unattained by any, the promoter of the rich, the destroyer, the firm, the vast, the receiver of good sacrifices, created the dawns and the sun.

5. The worshippers, devout and contemplating, offered worship and through sacrifice obtained prosperity from the sender of the waters. [ They ], desirous of protection, obtained riches through prayer [ and ] worship, offering oblations to Indra.

---

४. यांतहि इंद्राचीं पुष्कळ विशेषणें आहेत आणि त्यांतून बहुतेक अशीं आहेत कीं, त्यांचा अर्थ फार करून एकसारिखाच आहे.

'समृद्धाचा प्रेरक'=' रध्रचोदः'. म्हणजे श्रीमंतांला प्रेरणा करणारा. पण या विशेषणाच्या अर्थाविषयीं संशय आहे.

५. सायणाप्रमाणें यांत जे उपासक सांगितले ते अंगिरस होत. अंगिरसांविषयीं सू. १ मं. ६ आणि सू. ५१ मं. ३ पहा.

**इन्द्र श्रेष्ठानि द्रविणानि धेहि चित्तिं दक्षस्य सुभगत्वमस्मे ।**
**पोषं रयीणामरिष्टिं तनूनां स्वाद्मानं वाचः सुदिनत्वमह्नाम्॥६॥२७**

इन्द्र । श्रेष्ठानि । द्रविणानि । धेहि । चित्तिम् । दक्षस्य । सुभगऽत्वम् । अस्मे इति ।
पोषम् । रयीणाम् । अरिष्टिम् । तनूनाम् । स्वाद्मानम् । वाचः । सुदिनऽत्वम् । अह्नाम् ॥ ६ ॥ २७ ॥

### भाषायाम्.

६. हे इन्द्र, अस्मे (=अस्मासु=अस्माकं गृहे) श्रेष्ठानि द्रविणानि (=धनानि) चित्तिं (=ज्ञानं) दक्षस्य सुभगत्वं (=बलस्य सौभाग्यं=सुभगं बलं) रयीणां पोषं (=धनानां पुष्टिं=त्वया दत्तानां धनानां वर्धनं) तनूनाम् अरिष्टिं (=शरीराणाम् आरोग्यं) वाचः स्वाद्मानं (=वाचो मधुरत्वं=मधुरां वाचम्) अह्नां सुदिनत्वं (=सुदिनानि अहानि) धेहि (=स्थापय=अस्मभ्यं प्रयच्छ) ॥

---

## सूक्तम् २२–२१३.

गृत्समद ऋषिः। इन्द्रो देवता। आद्यायाम् अष्टिश्छन्दश्चतुःषष्ट्यक्षरा। अवशिष्टाः षष्ट्यक्षरा अतिशक्वर्यः। अन्त्याष्टिर्वा ॥

**त्रिकद्रुकेषु महिषो यवाशिरं तुविशुष्मस्तृपत्सोममपिबद्विष्णुना सुतं यथावशत् ।**
**स ईं ममाद महि कर्म कर्तवे महामुरुं सैनं सश्चद्देवो देवं सत्यमिन्द्रं सत्य इन्दुः ॥ १ ॥**

त्रिऽकद्रुकेषु । महिषः । यवऽआशिरम् । तुविऽशुष्मः । तृपत् । सोमम् । अपिबत् । विष्णुना । सुतम् । यथा । अवशात् ।
सः । ईम् । ममाद । महि । कर्म । कर्तवे । महाम् । उरुम् । सः । एनम् । सश्चत् । देवः । देवम् । सत्यम् । इन्द्रम् । सत्यः । इन्दुः॥१

### भाषायाम्.

१. महिषः (=महान्) तुविशुष्मः (=बहुबल) [इन्द्रः] त्रिकद्रुकेषु (="ज्यो-

६. हे इंद्रा, तूं आमच्या घरीं श्रेष्ठ संपत्ति, ज्ञान, आणि बळाचें सौभाग्य ठेव; धनसंपत्तींची समृद्धि, शरीरांचें आरोग्य, वाचेचें मधुरत्व आणि दिवसांचें सुदिनत्व [ ठेव ].

6. O Indra, put into our house excellent riches, knowledge, the good blessing of strength, the growth of wealth, the security of persons, the sweetness of voice, the fineness of days.

६. हा मंत्र प्रख्यात आहे. महयज्ञ, जातकर्म इत्यादि जे संस्कार, त्यांत याचा पाठ म्हणण्याची चाल आहे. सूक्तकर्ता गृत्समद ऋषि यांत जे वर मागतो त्यांकडे लक्ष्य देण्यासारिखें आहे.

---

## सूक्त २२-२१३.

ऋषि—गृत्समद. देवता—इंद्र. वृत्त—पहिलीचें अष्टि, दुसरी आणि तिसरी यांचें अतिशक्करी, चवथीचें अतिशक्करी किंवा अष्टि.

## HYMN 22-213.

To *Indra*. By *Gritsamada*. Metre—of the first *Ashti*, of verses 2 and 3 *Atis'akvari*; of the fourth *Atis'akvari* or *Ashti*.

१. महान् [ आणि ] महाबल [ इन्द्र ] त्रिकद्रुकांत इच्छेप्रमाणें यवाशिर सोम विष्णूसह तृप्ति होईपर्यंत पिता झाला. तो [ सोम ] महान् [ आणि ] विस्तीर्ण इंद्रानें महा कृत्य करावें म्हणून त्याला माद आणिता झाला. तो देदीप्यमान आणि सत्य रस या देदीप्यमान आणि सत्य इंद्राला प्रबळ करो.

1. In the Trikadruka [ festivals ] the great and very mighty [Indra] drank as he wished with Vishnu the barley-malted soma to his satisfaction. That soma exhilarated great [ and ] vast Indra for achieving a great deed. May that juice, bright and true, [ now ] invigorate that Indra, bright and true.

१. या ऋचेचें वृत्त अष्टि; म्हणजे चौसष्ठ अक्षरांचा एक श्लोक. हीं चौसष्ठ अक्षरें अशा रीतीनें गोंविलेलीं असतात कीं, पहिला चरण बारा, दुसरा आणि

अध त्विषीमाँ अभ्योजसा क्रिविं युधाभवदा रोदसी अपृणदस्य मज्मना प्र वावृधे ।
अधत्तान्यं जठरे प्रेमरिच्यत सैनं सश्चद्देवो देवं सत्यमिन्द्रं सत्य इन्दुः ॥ २ ॥

अध । त्विषिऽमान् । अभि । ओजसा । क्रिविम् । युधा । अभवत् । आ । रोदसी इति । अपृणत् । अस्य । मज्मना । प्र । ववृधे ।
अधत्त । अन्यम् । जठरे । प्र । ईम् । अरिच्यत । सः । एनम् । सश्चत् । देवः । देवम् । सत्यम् । इन्द्रम् । सत्यः । इन्दुः ॥ २ ॥

तिर्गौरायुरित्येतन्नामकेष्वाभिप्लविकेष्वहःसु" ) सुतम् ( =अभिषुतं सोमं ) यथावशत् [ तथा ] ( =यथाकामयत तथा=इच्छामनु ) विष्णुना ( =एतन्नाम्ना देवेन सह ) तृपत् अपिबत् ( =आ तृप्तः पीतवान् ) । स [ पीतः सोमो ] महि कर्म कर्तवे (=महद् वीरकर्म वृत्रहननादिरूपं कर्तुम्) ईं महाम् उरुम् (=एनं महान्तं विस्तीर्णं चेन्द्रं ) ममाद ( =अमादयत् ) । देवः ( =दीप्तः ) सत्यः स इन्दुः ( =सोमो ) देवं (=दीप्तं) सत्यम् एनम् इन्द्रम् [ इदानीमपि ] सश्चत् ( =प्रवर्धयतु ) ॥

## भाषायाम्.

२. अध (=अनन्तरं ) त्विषीमान् (=बलवान् ) [ इन्द्र ] ओजसा (=स्वतेजसा) युधा (=युद्धेन ) क्रिविं [ नामासुरम्] अभि अभवत् (=अभिभूतवान् ) । [सः] अस्य मज्मना प्र वावृधे (=तस्य सोमस्य बलेन प्रवृद्धो बभूव) [स्वकीयेन प्रवृद्धत्वेन च] रोदसी ( =द्यावापृथिव्यौ ) आ अपृणत् ( =पूरयामास ) । [ एकः ] अन्यं जठरे अधत्त ( =इन्द्रः पीतं सोमं स्वकीयोदरेधारयत् ) । [ अन्यः=सोम ] ईं प्रारिच्यत ( =अन्यस्मात्=इन्द्रात् अधिको बभूव ) । देवः (=दीप्तः ) सत्यः स इन्दुः (=सोमो) देवं ( =दीप्तं ) सत्यम् एनम् इन्द्रम् [ इदानीमपि ] सश्चत् ( =प्रवर्धयतु ) ॥

तिसरा प्रत्येकीं आठ, मिळून सोळा; चौथा चार; पांचवा बारा, सहावा आणि सातवा प्रत्येकीं आठ, मिळून सोळा; आठवा चार; मिळून चरण आठ, अक्षरें चौसष्ट.

'त्रिकद्रुकांत' सू. ३२ मं. ३ पहा.

'विष्णु.' सू. २२ मं. १६ पहा.

'यवाशिर'=' यवाशिरम्.' म्ह. धान्यामध्यें घालून तयार केलेला. आधुनिक मद्य जसें धान्य कुजवून त्यापासून तयार करितात, त्याप्रमाणें तयार केलेला सोम असें विवक्षित दिसतें.

२. आणि तेजस्वी इंद्र क्रिवीशीं युद्ध करून [ आपल्या ] पराक्रमानें त्याला जिंकिता झाला. तो त्या [ सोमा ]च्या बळानें वाढून द्यावापृथिवींस भरून टाकिता झाला. तो यास आपल्या जठरांत धरिता झाला, हा त्याहून मोठा झाला. [ तर ] तो देदीप्यमान आणि सत्य रस या देदीप्यमान आणि सत्य इंद्राला प्रबळ करो.

2. And mighty [Indra] defeated with his valour Krivi in battle. He filled earth and heaven [ when ] he grew vast with the force of that [ soma ]. He held the other ( the soma ) in his belly. The other ( the soma) reached beyond him. May that juice, bright and true, [now ] invigorate that Indra, bright and true.

---

२. या ऋचेचें वृत्त अतिशक्करी आहे. अतिशक्करीचें लक्षण. सू. १३७ मं. १ याजवरील टिपेंत पहा.

'क्रिवि' या असुराविषयीं सू. २०८ मं. ६ पहा.

'याच्या बळानें वाढून द्यावापृथिवींस भरून टाकिता झाला.' म्हणजे सोम पिऊन इंद्राला बळ आलें, त्याच्या योगानें तो इतका मोठा झाला कीं, द्यावापृथिवींस त्याणें आपल्या शरीरानें भरून टाकिलें.

'तो यास इ०' इंद्रानें प्यालेला सोम जरी पोटांत होता तरी इंद्र वाढून त्याणें उभयलोक भरून टाकिले असें जें वर सांगितलें, तें वस्तुतः सोमाचेंच वाढणें असें समजलें पाहिजे; अथवा वाढला जो तो इंद्र नव्हे, परंतु इंद्राच्या पोटांतील सोम असें समजावें. असा कवीचा अभिप्राय.

साकं जातः क्रतुना साकमोजसा ववक्षिथ साकं वृद्धो वीर्यैः सासहिर्मृधो विचर्षणिः ।
दाता राधः स्तुवते काम्यं वसु सैनं सश्चद्देवो देवं सत्यमिन्द्रं सत्य इन्दुः ॥ ३ ॥

साकम् । जातः । क्रतुना । साकम् । ओजसा । ववक्षिथ । साकम् । वृद्धः । वीर्यैः । ससहिः । मृधः । विऽचर्षणिः ।
दाता । राधः । स्तुवते । काम्यम् । वसु । सः । एनम् । सश्चत् । देवः । देवम् । सत्यम् । इन्द्रम् । सत्यः । इन्दुः ॥ ३ ॥

तव त्यन्नर्यं नृतोऽप इन्द्र प्रथमं पूर्व्यं दिवि प्रवाच्यं कृतम् ।
यद्देवस्य शवसा प्रारिणा असुं रिणन्नपः ।
भुवद्विश्वमभ्यादेवमोजसा विदादूर्जं शतक्रतुर्विदादिषम् ॥४।१८।२

तव । त्यत् । नर्यम् । नृतो इति । अपः । इन्द्र । प्रथमम् । पूर्व्यम् । दिवि । प्रऽवाच्यम् । कृतम् ।
यत् । देवस्य । शवसा । प्र । अरिणाः । असुम् । रिणन् । अपः ।
भुवत् । विश्वम् । अभि । अदेवम् । ओजसा । विदात् । ऊर्जम् । शतऽक्रतुः । विदात् । इषम् ॥ ४ ॥ १८ ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

३. [त्वम् इन्द्रः] क्रतुना साकं (=प्रज्ञया सह) जातः । ओजसा साकं ववक्षिथ (=तेजसा सह वर्धितोसि) । वीर्यैः साकं वृद्धः (=पराक्रमैः सह प्रवृद्धोसि) । विचर्षणिः (=विशेषेण द्रष्टा त्वं) मृधः सासहिः (=हिंसकानां जेता) [भवसि] । स्तुवते (=स्तोत्रं कुर्वते) राधः (=धनं=धनस्य) काम्यं वसु (=मनोहरस्य वित्तस्य) दाता [भवसि] । देवः (=दीप्तः) सत्यः स इन्दुः (=सोमो) देवं (=दीप्तं) सत्यम् एनम् इन्द्रम् [इदानीमपि] सश्चत् (=प्रवर्धयतु) ॥

४. हे इन्द्र, हे नृतो (=नेतः= नायक), तत् (=वक्ष्यमाणं) नर्यं (=नृभ्यो हितं) तव दिवि प्रवाच्यं (=द्युलोके स्तवनीयं) पूर्व्यं (=पुरातनम्) अपः (=कर्म=वीरकर्म) प्रथमं कृतं [भवति] यत् शवसा (=तव बलेन) अपो रिणन्

३. [ तूं इंद्र ] प्रज्ञेसह जन्मलास, तेजासह वाढलास, पराक्रमांनीं मोठा झालास. अत्यंत मेधावी असा तूं दुष्टांचा संहार करणारा [ होस ]. तूं स्तोत्याला धन आणि रमणीय संपत्ति देणारा [आहेस]. [ तर ] तो देदीप्यमान आणि सत्य रस या देदीप्यमान आणि सत्य इंद्राला प्रबळ करो.

४. हे इंद्रा, हे नायका, तुझें स्वर्गीं वाखणण्या जोगें प्रथम केलेलें मनुष्यहितकारक पुरातन चरित हें [ होय ] कीं, तूं आपल्या बळानें देदीप्यमान शत्रूचा प्राण घालविता झालास आणि उदकांला मुक्त करिता झालास.– [ हा ] शतप्रज्ञ [ इंद्र.] सकल देवहीन जनास निर्दाळो [ आणि ] बळ पावो आणि हविरन्नाप्रत पावो.

3. With wisdom wast thou born, with might didst thou grow, with deeds of valour didst thou become great. [Thou art] a giver of wealth [ and ] of handsome riches to the praiser. May that juice bright and true [now] invigorate that Indra, bright and true.

4. O leader, o Indra, that exploit, beneficial to mankind, ancient and fit to be proclaimed in heaven, was achieved first, that thou didst with [ thy ] valour destroy the life of [ thy ] resplendent enemy, sending forth the waters.—May Indra of hundred intellects defeat every godless [man] and may he receive strength, may he receive the oblation.

---

४. 'यांत जो पराक्रम वर्णिला आहे तो इंद्रानें वृत्राला मारून उदकें मुक्त केलीं हाच होय.'

'सकळ देवहीन जनास इ०.' याचें तात्पर्य असें कीं, इंद्र आर्य लोकांचे जे देवास न मानणारे अनार्य शत्रु, त्या सर्वांस मारून टाको म्हणजे आर्य लोक त्याला हवि देऊन बलिष्ठ करितील.

## सूक्त ४–२३८.

ऋषि–विश्वामित्र. वृत्त–त्रिष्टुभ्.

हें आप्री सूक्त आहे त्यामुळें आप्री सूक्तांतील ज्या क्रमानें ज्या देवता प्रति ऋचेंत यावयाच्या त्या यांत आहेत.

१. चांगला पेटलेला असा तूं आम्हांला अनुकूळ हो. तूं आपल्या अत्यंत प्रकाशानें धनाविषयीं कृपा कर. हे देवा, तूं यज्ञासाठीं देवांस घेऊन ये. हे अग्नी, सखा असा जो तूं तो अनुकूळ [ होऊन ] सख्यांला पूज.

२. ज्या [ यज्ञा]ला वरुण, मित्र, [ आणि ] अग्नि [ हे ] देव नित्य दिवसास तीन वेळ संपादितात, त्या आमच्या या पूजक यज्ञाला, हे तनूनपात्, तूं मधुयुक्त [आणि] घृतपूर्ण कर.

## Hymn 4–238.

This is an *Âprî* hymn. For Devatâ see hymn 188. By *Vis'vâmitra.* Metre—*Trishṭubh.*

1. *Kindled* and *kindled*, do thou become favourable unto us. With thy exceeding splendor give us a favour of wealth. Bring, o god, the gods hither to the sacrifice. Favouring do thou, o Agni, a friend sacrifice to the friends.

2. O *Tanûnapât*, crown with sweetness [and] clarified butter this our sacrifice, which the gods Varuṇa, Mitra, [and] Agni accomplish daily three times a day, and which is full of reverence.

---

१. सू. १८८ मं. १ पहा.

'सख्यांला'=' सखीन्.' म्हणजे अग्नीचे मित्र जे देव त्यांला.

२. 'ज्या या यज्ञाची पूर्णता प्रतिदिवशीं तीनदा वरुण, मित्र आणि अग्नि हे देव करितात त्या यज्ञाला, हे तनूनपात्, तूं पूर्ण कर; आणि त्यापासून मधुर आणि पुष्टिकारक असें मेघोदक आम्हांस प्राप्त करून दे' असा भावार्थ.

सू. १८८ मं. २ पहा.

प्र दीधितिर्विश्ववारा जिगाति होतारमिळः प्रथमं यजध्यै ।
अच्छा नमोभिर्वृषभं वन्दध्यै स देवान्यक्षदिषितो यजीयान् ॥३॥

प्र । दीधितिः । विश्वऽवारा । जिगाति । होतारम् । इळः । प्रथमम् । यजध्यै ।
अच्छ । नमःऽभिः । वृषभम् । वन्दध्यै । सः । देवान् । यक्षत् । इषितः । यजीयान् ॥ ३ ॥

ऊर्ध्वो वां गातुरध्वरे अकार्यूर्ध्वा शोचींषि प्रस्थिता रजांसि ।
दिवो वा नाभा न्यसादि होता स्तृणीमहि देवव्यचा वि बर्हिः॥४॥

ऊर्ध्वः । वाम् । गातुः । अध्वरे । अकारि । ऊर्ध्वा । शोचींषि । प्रऽस्थिता । रजांसि ।
दिवः । वा । नाभा । नि । असादि । होता । स्तृणीमहि । देवऽव्यचाः । वि । बर्हिः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. विश्ववारा (=सर्वैर्वरणीया=सर्वप्रिया) दीधितिः (=स्तुतिः) प्रथमं होतारम् (=आदिं होतारम्) इळो यजध्यै (=हवींषि मार्पयितुं) [तं प्रति] प्र जिगाति (=प्रकर्षेण गच्छतु)—वृषभं वन्दध्यै (=वीरं तं वन्दितुं) नमोभिः (=नमस्कारैः) अच्छ [प्र जिगातु] (=तं प्रति गच्छतु) । इषितः (=अस्माभिः प्रेषितो) यजीयान् (=यष्टृतमः=यजनकर्मणि कुशलतमः) स देवान् यक्षत् (=पूजयतु) ॥ ३ ॥

४. [हे अग्ने], अध्वरे (=अस्मिन्यज्ञे) वां गातुः (=तव मार्गः) ऊर्ध्वः अकारि (=उन्नतः क्रियते=आकाशं प्रति गन्तुं प्रवृत्तः) । [तव] शोचींषि (=तव तेजांसि) ऊर्ध्वा (=ऊर्ध्वानि=ऊर्ध्वगतिकानि भूत्वा) रजांसि प्रस्थिता (=आकाशप्रदेशान् प्रति प्रस्थितानि) ।—होता (=अग्निलक्षणो) दिवो नाभा (=द्युलोकस्य नाभौ मध्यप्रदेशे) न्यसादि (=निषीदति) । [अतः कारणात्] देवव्यचा बर्हिः (=देवव्यचो बर्हिर्देवैर्व्याप्तं बर्हिः) वि स्तृणीमहि (=विशेषेण स्तृणीमः) ॥

३. आदि होत्याला अन्न अर्पण करण्याकरितां विश्वकाम्य स्तुति त्याजप्रत जाओ. त्या वीराला वंदण्यासाठीं नमस्कारांनीं त्याप्रत जाओ. आम्हीं पाठविलेला असा तो उत्तम यजक देवांला भजो.

3. May the *praise* dear to all run to the primeval invoker to offer him oblations—[ run] towards the hero for to adore [ him ]. May he, sent [by us] [and] most skilful in sacrificing, worship the gods.

४. या यज्ञांमध्यें तुझा मार्ग वर झाला आहे. [ आणि तुझीं ] तेजें आकाशाकडे निघालीं [ आहेत ]. द्युलोकाच्या मध्य भागीं होता बसला आहे. देवांला ठाव देणारे दर्भ आपण पसरूं या.

4. Thy path is turned upwards in this sacrifice, [thy] effulgence has started upwards into the sky. The invoker has sat down in the navel of heaven. Let us spread the *kus'a-grass* that gives a seat to the gods.

---

३. ही ऋचा इड्डामक अग्नीविषयीं आहे. यांत इळा हा शब्द आहे त्यावरून जावयाचें. सू. १८८ मं. ३ पहा.

४. ही ऋचा दर्भाविषयीं आहे. सू. १८८ मं. ४ पहा.

'अग्नि प्रदीप्त झाला आहे व त्याच्या ज्वाळा आकाशाकडे धांवत आहेत. यास्तव आतां देवयजनासाठीं आपण आंथरूं'.

'तुझासा'=याम्. हें व्यत्ययानें द्विवचन झालें आहें असें समजलें पाहिजे. उत्तरार्धाच्या आरंभीं दुसरा शब्द 'वा' आहे, त्याप्रमाणेंच हा पूर्वार्धांतील 'वाम्' हि 'वा'च असावा असें नसेल काय ?

'द्युलोकाच्या मध्य भागीं'='दिवोनाभा' म्हणजे यज्ञमंडपाच्या मध्य भागीं असा अर्थ सायण करितात. स्वर्गीचा देव अग्नि यज्ञमंडपांत प्रादुर्भूत झाला त्यामुळें यज्ञमंडपालाच द्युलोक हें नांव दिलें आहे असें असेल.

सप्त होत्राणि मनसा वृणाना इन्वन्तो विश्वं प्रति यन्नृतेन ।
नृपेशसो विदथेषु प्र जाता अभीमं यज्ञं वि चरन्त पूर्वीः ॥५॥२२॥

सप्त । होत्राणि । मनसा । वृणानाः । इन्वन्तः । विश्वम् । प्रति । यन् । ऋतेन ।
नृऽपेशसः । विदथेषु । प्र । जाताः । अभि । इमम् । यज्ञम् । वि चरन्त । पूर्वीः ॥ ५ ॥ २२ ॥

आ भन्दमाने उषसा उपाके उत स्मयेते तन्वा विरूपे ।
यथा नो मित्रो वरुणो जुजोषदिन्द्रो मरुत्वाँ उत वा महोभिः ॥६॥

आ । भन्दमाने इति । उषसौ । उपाके इति । उत । स्मयेते इति । तन्वा । विरूपे इति विऽरूपे ।
यथा । नः । मित्रः । वरुणः । जुजोषत् । इन्द्रः । मरुत्वान् । उत । वा । महःऽभिः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. मनसा वृणानाः ( =स्तोत्रेण प्रार्थ्यमाना ) [ देवा ] विश्वं ( =सकलं जगद् ) ऋतेन ( =सत्यभूतेन मेघोदकेन ) इन्वन्तः ( =प्रीणयन्तः सन्तः ) सप्त होत्राणि प्रति यन् ( =होतुः सप्त कर्माणि प्रति आगच्छन्तु ) । नृपेशसः (=नररूपा ) विदथेषु प्र जाताः ( =यज्ञेषु प्रादुर्भूताः ) पूर्वीः ( =पूर्व्यो बह्व्यो ) [ द्वारो देव्यः ] इमं यज्ञम् अभि वि चरन्त ( =अभिचरन्तु आगच्छन्तु ) ॥

६. उपाके ( =परस्परं संगते ) तन्वा विरूपे ( =आकारेण परस्परं भिन्ने ) उषसौ ( =नक्तोषसौ ) भन्दमाने ( =स्तूयमाने सत्यौ ) आ[गच्छताम् ] यथा मित्रो वरुणः उत वा ( =अपि च ) मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्युक्त इन्द्रो ) नः ( =अस्मान् ) महोभिर्जुजोषत् ( =तेजोभिः सेवेत=अनुगृह्णीयात् ) ॥

५. स्तोत्रानें प्रार्थिलेले [असे देव] सकळ जगताला उदकानें आनंदवीत होत्याच्या एकामागून एक सात कर्मांप्रत येओत. यज्ञांमध्यें उत्पन्न झालेल्या ज्या नराकार पुष्कळ [द्वारो देवी] त्या या यज्ञाप्रत येओत.

६. एकमेकांला लागलेल्या आणि भिन्न भिन्न आकाराच्या अशा ज्या उषा आणि रात्र, त्या स्तविल्या होत्साया येओत आणि हंसोत, कीं जेणेंकरून मित्र, वरुण आणि मरुतांसहित इंद्र आपल्या तेजांनिशीं आम्हांवर अनुग्रह करतील.

5. May [the gods], waited upon by the hymn, come to the seven works of the invoker, and delight the world with the holy water. May the numerous *Doors* of human form, born in the sacrifices, come to this sacrifice.

6. May the *Night* and the *Dawn*, united each to the other and each differing as to features, [come] hither and smile, being praised; so that Mitra, Varuṇa and Indra at the head of the Maruts, may favour us with their splendors.

---

५. हा मंत्र द्वारो देवींविषयीं आहे. सू. १८८ मं. ५ पहा.

'उदकानें'='ऋतेन'. 'ऋत' शब्दाचा अर्थ उदक असा फार संभवतो म्हणून आम्हीं. सू १०५ मं. १२ यावर सांगितलेंच आहे तें पहा.

'सात कर्मांप्रत'=सप्त होत्राणि. व षट्कर्त्यांचीं सात कर्में असें सायण म्हणतात.

६. सू. १८८ मं. ६ पहा.

दैव्या होतारा प्रथमा न्यृञ्जे सप्त पृक्षासः स्वधया मदन्ति ।
ऋतं शंसन्त ऋतमित्त आहुरनु व्रतं व्रतपा दीध्यानाः ॥ ७ ॥

दैव्या । होतारा । प्रथमा । नि । ऋञ्जे । सप्त । पृक्षासः । स्वधया । मदन्ति ।
ऋतम् । शंसन्तः । ऋतम् । इत् । ते । आहुः । अनु । व्रतम् । व्रतऽपाः । दीध्यानाः ॥ ७ ॥

आ भारती भारतीभिः सजोषा इळा देवैर्मनुष्येभिरग्निः ।
सरस्वती सारस्वतेभिरर्वाक् तिस्रो देवीर्बर्हिरेदं सदन्तु ॥ ८ ॥

आ । भारती । भारतीभिः । सऽजोषाः । इळा । देवैः । मनुष्येभिः । अग्निः ।
सरस्वती । सारस्वतेभिः । अर्वाक् । तिस्रः । देवीः । बर्हिः । आ । इदम् । सदन्तु ॥ ८ ॥

---

### भाषायाम्.

७. दैव्या (=दिव्यौ) प्रथमा (=प्रथमावादिभूतौ) होतारा (=देवानामाह्वातारौ) नि ऋञ्जे (= प्रसाधयामि=प्रसादयामि) । ऋतं शंसन्तः (=सत्यभूतं मेघोदकमाशंसमानाः) सप्त पृक्षासः (=ऋत्विजो) व्रतमनु व्रतपाः (=व्रतं कर्मानुसृत्य व्रतरक्षिणः कर्मणो रक्षितारो) दीध्यानाः (=ध्यानरताः सन्तस्) ते ऋतमित् आहुः (=अग्निरेव सत्यमिति वदन्ति) ॥

८. भारतीभिः (=? "भरतस्य सूर्यस्य संबन्धिनीभिः") सजोषाः (=सं[illegible] भारती [नाम देवी] देवैर्मनुष्येभिः (=देवैर्मानवैश्च) [संगता] इळा [[illegible] सारस्वतैः (=? सरस्वतीसंबन्धिभिः) [संगता] सरस्वती [नाम देवी] [इति] तिस्रो देवीः (=देव्यः) आ[गत्य] अग्निश् [च] अर्वाग् आ[गत्य] इदं बर्हिः (=अस्मिन् बर्हिषि) सदन्तु (=निषीदन्तु) ॥

७. दोन दिव्य आदि होत्यांला मी आळवितों. सत्य[रूप उदका]ची याचना करणारे सात ऋत्विज् [ त्यांला ] हविरन्नानें आनंदवीत आहेत. कर्माला अनु[सरून] कर्मांचें रक्षण करणारे [आणि ] ध्यानी [ असे ] ते [ ऋत्विज् ] [अग्नीला]च सत्य म्हणतात.

7. I propitiate the two primeval *divine invokers*. The seven priests, praying for the holy [water], delight [them] with oblation. Preserving the law according to the law, and full of contemplation, they say [Agni] [is] Holiness.

८. भारतींसहित भारती, देव आणि मनुष्य यांसहित इळा, [ आणि ] सारस्वतांसहित सरस्वती [ ह्या ] तीन देवी [आणि] अग्नि [ हे ] येऊन या दर्भांवर बसोत.

8. May the three goddesses *Bhâratî* accompanied by the Bhâratîs, *Ilâ* by the gods [ and ] the men, [and] *Sarasvatî* by the Sârasvatas, [ as also ] Agni, come and sit on this *Kus'a-grass*.

---

७. ही ऋचा दोघे जे 'दिव्य होते' म्हणून आप्रीसूक्तांत प्रसिद्ध असतात, त्यांविषयीं आहे. सू. १८८ मं. ७ पहा.

तात्पर्यः–' दोघां दिव्य होत्यांला आमचे ऋत्विज् हविरन्न अर्पण करित आहेत. ते अग्नीलाच सत्य म्हणतात. अग्नीशिवाय दुसरें सत्य म्हणून कांहीं नाहीं असें समजतात'.

तथापि 'ऋत' शब्दाचे वेगवेगळे अर्थ एकाच ऋचेंत असल्यामुळें स्पष्ट अर्थ समजत नाहीं. आणि सात ऋत्विज् कोण कोण समजावयाचे तेंहि किंचित् संदिग्ध आहे.

८. भारती, इळा, सरस्वती या तीन ' देवीं 'विषयीं ही ऋचा आहे. सू. १८८ मं ८ पहा.

या ऋचेंत ज्या पुष्कळ भारती आणि सारस्वत सांगितले ते कोण असतील तें समजत नाहीं. सरस्वतीचे जे [ पुत्र ] ते सारस्वत. परंतु ते कोण ? कदाचित् जी सरस्वती या मंत्रांत सांगितली तिचे पुत्र असावेत. त्याप्रमाणेंच ' भारतीभिः' म्हणजे भारती देवी जी कोण या ऋचेंत सांगितलेली, तिच्या कन्या असाव्यात, असें दिसतें.

तन्नस्तुरीपमर्ध पोषयित्नु देव त्वष्टर्वि रराणः स्यस्व ।
यतो वीरः कर्मण्यः सुदक्षो युक्तग्रावा जायते देवकामः ॥ ९ ॥

तत् । नः । तुरीपम् । अर्ध । पोषयित्नु । देव । त्वष्टः । वि । रराणः । स्यस्वेति स्यस्व ।

यतः । वीरः । कर्मण्यः । सुऽदक्षः । युक्तऽग्रावा । जायते । देवऽकामः ॥ ९ ॥

वनस्पतेऽव सृजोप देवानग्निर्हविः शमिता सूदयाति ।
सेदु होता सत्यतरो यजाति यथा देवानां जनिमानि वेद ॥१०॥

वनस्पते । अव । सृज । उप । देवान् । अग्निः । हविः । शमिता । सूदयाति ।

सः । इत् । ऊं इति । होता । सत्यऽतरः । यजाति । यथा । देवानाम् । जनिमानि । वेद ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

९. अध ( =अधुना ) देव ( =दीप्तिमन् ) हे त्वष्टः, यतः ( =यतः सकाशात् कर्मण्यः ( =कर्मकुशलः ) सुदक्षः ( =शोभनबलो ) युक्तग्रावा ( =ग्राव्णोर्युक्त =ग्रावभिः सोममभिषूय देवप्रीत्यर्थं यज्ञस्य कर्ता ) देवकामः ( =देवान् काम वीरः ( =पुत्रो ) जायते ( =उत्पद्यते ) तत् ( =तादृशं ) पोषयित्नु ( =पोष रीपं ( =रेतो ) नः ( =अस्मभ्यं ) [ त्वं ] रराणः ( = माणः प्रसन्न स्यस्व ( =मोचय=पातय ) ॥

१०. हे वनस्पते (=वनस्पतिविकार यूप ), [त्वं] देवान् अव उप सृज यथा मीपे कुरु ”) । शमिता ( =हविषः संस्कर्ता ) अग्निर्हविः सूदयाति (=सं स इत् उ सत्यतरो होता ( =अपि च स एवातिशयेन सत्यो देवानामाह्वात ( =देवान् यजतु ) । यथा ( =यस्मात् कारणात् ) [ स ] देवानां जनि ( =देवानां जातानि देवप्रकारान् जानाति ) ॥

९. हे दीप्तिमान् त्वष्टया, तूं प्रसन्न [होऊन] आम्हांपासून असें उत्कर्षकारक बीज पाड, कीं त्यापासून पराक्रमी, प्रबळ, ग्रावे जोडणारा, [ आणि ] देवांवर प्रीति करणारा असा शूर पुत्र जन्मेल.

१०. हे वनस्पती, तूं देवांला घेऊन ये. शमिता अग्नि हवि शिजवो. तोच अत्यंत सत्य होता यजन करो, कारण कीं तो देवजनांला जाणतो.

9. And, o resplendent *Tvashṭâ*, pleased do thou let fall from us that prosperous seed from which may be born a hero, brave, powerful, sacrificing [and] godloving.

10. O *Lord of the forest*, do thou bring the gods near. May Agni the preparer cook the oblation. May that very invoker, most truthful, conduct the sacrifice, as he knows the race of the gods.

---

९. सू. १८८ मं ९. पहा. त्वष्टा देव बीजापासून प्रजोत्पत्ति मनुष्यांचे आंगीं करितो याविषयीं सू. १४२ मं. १० आणि त्याजवरील टीप पहा.

' ग्रावे जोडणारा '=' युक्तग्रावा '. म्हणजे सोमरस काढण्याचे जे पाषाण ते जोडून सोमरस काढील आणि देवांचें यजन करील असा.

दुष्ट ग्रहशांतींत (म्हणजे चांगल्या मुहूर्तावर जन्म न झालें तर जी शांति करितात त्यांत) हा मंत्र म्हणत असतात. परंतु जन्म होण्याच्या पूर्वीं गर्भ राहण्याच्या अगोदर या मंत्राचा उपयोग. गर्भ राहून जन्म झाल्यावर हा मंत्र म्हणण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

१०. सू. १८८ मं. १० पहा. हा मंत्र यूप जो खांब, कीं ज्याला वळी द्यावयाचा पशु बांधीत त्याविषयीं आहे. त्याला वनस्पति म्हणजे लांकडांचा राजा असें येथें म्हटलें आहे.

आ याह्यग्ने समिधानो अर्वाङिन्द्रेण देवैः सरथं तुरेभिः ।
बर्हिर्न आस्तामदितिः सुपुत्रा स्वाहा देवा अमृता मादयन्ताम् ॥
॥ ११ ॥ २३ ॥

आ । याहि । अग्ने । सम्ऽइधानः । अर्वाङ् । इन्द्रेण । देवैः । सऽरथम् । तुरेभिः ।
बर्हिः । नः । आस्ताम् । अदितिः । सुऽपुत्रा । स्वाहा । देवाः । अमृताः । मादयन्ताम् ॥ ११ ॥ २३ ॥

## भाषायाम्.

११. हे अग्ने, समिधानः (=समिध्यमानः सन्) इन्द्रेण तुरेभिः (=त्वरमाणैर्) देवैः सरथं (=समानरथं यथा तथा) अर्वाग् आ याहि (=अत्रायाहि)। सुपुत्रा (=शोभनाः पुत्रा यस्याः सा) अदितिर्नो बर्हिरास्ताम् (=अस्माकं बर्हिष्युपविशतु)। अमृताः (=अमरा) देवाः स्वाहा (=स्वाहाकारेण) मादयन्तां (=तृप्यन्तु)॥

## सूक्तम् ५–२३९.

विश्वामित्र ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

प्रत्यग्निरुषसश्चेकितानोऽबोधि विप्रः पदवीः कवीनाम् ।
पृथुपाजा देवयद्भिः समिद्धोऽप द्वारा तमसो वह्निरावः ॥ १ ॥

प्रति । अग्निः । उषसः । चेकितानः । अबोधि । विप्रः । पदऽवीः । कवीनाम् ।
पृथुऽपाजाः । देवयत्ऽभिः । सम्ऽइद्धः । अप । द्वारा । तमसः । वह्निः । आवरित्यावः ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. उषसश्चेकितानः (=जानन्) विप्रः (=मेधावी) कवीनां पदवीः (=नायकः) अग्निः प्रत्यबोधि (=प्रतिबुध्यते)। पृथुपाजाः (=दूरप्रसारि पाजस्तेजो यस्य स) देवयद्भिः समिद्धः (=देवकामैः सम्यग्दीप्तो) वह्निः (=हविषां वाहकोग्निस्) तमसो द्वारा (=अन्धतमसस्य द्वाराणि) अपावः (=अपावृणोत्)॥

११. हे अग्नी, तूं पेटविलेला होत्साता, इंद्रासहित [आणि] वेगवान् देवांसहित एका रथावर बसून इकडे ये. चांगल्या पुत्रांची माता अशी जी अदिति ती आमच्या दर्भावर बसो. अमर देव स्वाहा [शब्दा]नें तृप्त होओत.

11. Being kindled, o Agni, come thou hither in the same chariot with Indra and with the quickly traversing gods. May Aditi, the mother of good sons, sit on our kus'a-grass. May the immortal gods be gratified with the exclamation *Svâhâ*.

११. ही ऋचा 'स्वाहा' या उच्चाराविषयीं आहे. सू. १८८ मं. ११पहा.

---

## सूक्त ५–२३९.

ऋषि–विश्वामित्र. देवता–अग्नि. वृत्त–त्रिष्टुभ्.

## HYMN 5–239.

To *Agni*. By *Vis'vâmitra*. Metre —*Trishtubh*.

१. उषांला जाणणारा [आणि] कवींचा नायक असा जो मेधावी अग्नि तो पुन: जागा झाला आहे. विस्तीर्णतेजोवान् वह्नि देवकामी जनांनीं पेटविला होत्साता अंधकाराचीं द्वारें उघडून टाकिता झाला आहे.

1. Agni, who observes the dawns, [who is] the wise leader of the poets, has waked again. The carrier [of oblation] whose splendor reaches far, [being] kindled by those who love the gods, has broke open the doors of darkness.

१. 'उषांला जाणणारा'='उषसश्चेकितानः.' म्ह० उषांला पाहणारा; अर्थात् उषेचा उदय होण्याच्या अगोदर जागा होणारा.

प्रेद्वग्निर्वावृधे स्तोमेभिर्गीर्भिः स्तोतृणां नमस्यं उक्थैः ।
पूर्वीर्ऋतस्यं संदृशश्चकानः सं दूतो अद्यौदुषसो विरोके ॥ २ ॥

प्र । इत् । ऊं इति । अग्निः । ववृधे । स्तोमेभिः । गीःऽभिः । स्तोतृणाम् । नमस्यः । उक्थैः ।
पूर्वीः । ऋतस्यं । सम्ऽदृशः । चकानः । सम् । दूतः । अद्यौत् । उषसः । विऽरोके ॥ २ ॥

अधाय्यग्निर्मानुषीषु विक्ष्व१पां गर्भो मित्र ऋतेन साधन् ।
आ हर्यतो यजतः सान्वस्थादभूदु विप्रो हव्यो मतीनाम् ॥ ३ ॥

अधायि । अग्निः । मानुषीषु । विक्षु । अपाम् । गर्भः । मित्रः । ऋतेनं । साधन् ।
आ । हर्यतः । यजतः । सानुं । अस्थात् । अभूत् । ऊं इति । विप्रः । हव्यः । मतीनाम् ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. नमस्यः (=पूज्यः) अग्निः स्तोतृणां स्तोमेभिः (=स्तोत्रैर्) गीर्भिः (=वाग्भिर्) उक्थैः (=शस्त्रैर्नाम स्तोत्रोच्चारप्रकारैः) प्र इत् उ ववृधे (=प्रकर्षणैव वृद्धिं प्राप्नोति) । ऋतस्य (=सत्यभूतस्य सूर्यस्य) पूर्वीः संदृशः (=बह्वीः शोभाश्) चकानः (=कामयमानः) [स] दूतः उषसो विरोके (=विरोचने प्रातःकाले) सम् अद्यौत् (=सम्यक् प्रकाशितवान्) ॥

३. अपां गर्भः (=मेघोदकानां सूनुर्) मित्रः (=सखा) ऋतेन साधन् (=सत्यभूतेन यज्ञेन मनोरथान् साधयन्) अग्निर्मानुषीषु विक्षु (=मनुसंबन्धिनीषु प्रजासु =अस्मिन्मनुष्यलोके) अधायि (=स्थापितोस्ति) । हर्यतः (=स्पृहणीयो) यजतः (=पूज्यः) [स] सानु आ अस्थात् (=आगत्य "उच्छ्रितं धिष्ण्यम् उत्तरवेद्याख्यम्" अध्यतिष्ठत्) । विप्रः (=मेधावी) मतीनां (=स्तोतृणां) हव्योभूत् उ (=स्तुत्योभूत्) ॥

२. पूजनीय अग्नि स्तोत्यांच्या स्तोत्रांनीं, वाणींनीं, आणि शस्त्रांनीं फार वाढला आहे. सत्य[रूप आदित्या]च्या अनेक शोभांची वांछा करून [ जो ] दूत उषेच्या प्रभातेबरोबर लकलकीत प्रकाशला आहे.

2. Adorable Agni has grown mighty through the hymns, the songs, and the encomiums of the praisers. Desirous of the many beauties of the holy [sun], the [celestial] messenger has burst into splendor at the break of dawn.

३. उदकांचा बाळ, मित्र, आणि सत्य[मय यज्ञा]नें कार्यसिद्धि करणारा असा जो अग्नि तो मनुष्यलोकीं स्थापिला आहे. तो कमनीय [आणि] पूज्य [अग्नि] येऊन शिखरावर बसला आहे. मेधावी [अग्नि] स्तोत्यांनीं आळविण्यास योग्य झाला आहे.

3. Agni the offspring of the [ celestial ] waters, the friend, accomplishing [his end] through the holy sacrifice, has been established among the human races. Handsome [and] adorable, [ Agni ] has come and mounted the pinnacle. Wise Agni has become worthy of being invoked by the poets.

---

२. 'शस्त्रांनीं वाढला आहे '=' उक्थैः प्र ववृधे.' ' शस्त्र ' म्ह० कितीएक सूक्तें मिळून एकत्र म्हणण्यासाठीं केलेला जो समूह तो.

३. ' शिखरावर बसला आहे ' =' सानु अस्थात्.' म्हणजे उत्तर वेदी या नांवाची अग्नि पेटविण्याची जी उंच जागा असते ती येथें विवक्षित आहे असें सायण म्हणतात. तें खरें असेल.

**मित्रो अग्निर्भवति यत्समिद्धो मित्रो होता वरुणो जातवेदाः ।**
**मित्रो अध्वर्युरिषिरो दमूना मित्रः सिन्धूनामुत पर्वतानाम् ॥ ४ ॥**

मित्रः । अग्निः । भवति । यत् । सम्ऽइद्धः । मित्रः । होता । वरुणः । जातऽवेदाः ।

मित्रः । अध्वर्युः । इषिरः । दमूनाः । मित्रः । सिन्धूनाम् । उत । पर्वतानाम् ॥ ४ ॥

**पाति प्रियं रिपो अग्रं पदं वेः पाति यह्वश्चरणं सूर्यस्य ।**
**पाति नाभा सप्तशीर्षाणमग्निः पाति देवानामुपमादमृष्वः ५॥२४**

पाति । प्रियम् । रिपः । अग्रम् । पदम् । वेः । पाति । यह्वः । चरणम् । सूर्यस्य ।

पाति । नाभा । सप्तऽशीर्षाणम् । अग्निः । पाति । देवानाम् । उपऽमादम् । ऋष्वः ॥ ५ ॥ २४ ॥

---

## भाषायाम्.

४. अग्निः समिद्धः ( =सम्यग्दीप्तः सन् ) मित्रः (=सूर्यो ) भवति । [ स ] मित्रो होता वरुणो जातवेदाश् [ च ] [ भवति ] । [ स ] मित्रः अध्वर्युः इषिरः ( =वायुर् ) दमूनाः ( =गृहेभ्यः सुखकारी एतन्नामकोग्निर् ) [ भवति ] । [ स ] सिन्धूनाम् उत पर्वतानां मित्रः ( =नदीनां पर्वतानां च ) मित्रः ( =सखा ) [ भवति ] ॥

५. [ अग्निः ] प्रियं ( =स्वप्रीतिकरम् ) अग्रं ( =श्रेष्ठं ) वेः पदम् ( =अग्निलक्षणस्य पक्षिणः स्थानं वैदिरूपं ) रिपः ( =शत्रोः सकाशात् ) पाति ( =रक्षति ) । यह्वः ( =महान् ) [ स ] सूर्यस्य चरणं ( =संचारस्थानं द्युलोकं ) पाति । अग्निर्नाभा ( =नाभौ मध्यमस्थाने=अन्तरिक्षे ) सप्तशीर्षाणं ( =सप्तशिरस्कं=? " मरुद्गणं " ) पाति । ऋष्वः ( =श्रेष्ठोग्निर् ) देवानामुपमादं ( =हर्षकारकं यज्ञं ) पाति ॥

४. जेव्हां अग्नि प्रदीप्त [होतो] [तेव्हां] [तो] मित्र होतो. [अग्नि] मित्र, होता, वरुण [आणि] जातवेद [होतो]. तो मित्र, अध्वर्यु, वायु, [आणि] दमूना [होतो]. [तो] सिंधूंचा आणि पर्वतांचा मित्र [होतो].

4. Agni when kindled becomes Mitra, [becomes] Mitra, Hotâ, Varuṇa, [and] Jâtavedas. [He becomes] Mitra, Adhvaryu, Vâyu, [and] Damûnas. [He becomes] the friend of the rivers and of the mountains.

५. तो पक्ष्याचें जें श्रेष्ठ प्रिय स्थान त्याला शत्रूपासून रक्षितो. महान् [अग्नि] सूर्याचें संचारस्थान रक्षितो. अग्नि मध्यस्थानीं सात शिरें ज्यास आहेत त्याला रक्षितो. सुंदर [अग्नि] देवांच्या यज्ञाला रक्षितो.

5. He protects from the enemy the beloved high seat of the Bird. Great [Agni] protects the sphere of the sun. Agni protects in the centre him who has seven heads. Supreme [Agni] protects that which delights the gods.

---

४. अग्नीचें सर्वात्मकस्वरूप यांत वर्णिलें आहे, असें सायण म्हणतात. त्याप्रमाणें तात्पर्य असें कीं, 'अग्नि हाच मित्र, वरुण, होता, जातवेद, अध्वर्यु, वायु, दमूना होय. आणि तोच नद्यांचा आणि पर्वतांचा मित्र होय.' तसेंच दिसतें खरें; पण त्याला अडचण इतकीच कीं 'मित्र' शब्द चारहि चरणांत आला आहे, आणि त्यांतून चवथ्या चरणांत त्याचा अर्थ, 'स्नेही' 'सखा' असा करावा लागतो.

५. 'पक्ष्याचें स्थान'='पदं वेः' म्हणजे 'वेदी.' अग्निरूप पक्षी ज्यांत बसतो तें स्थान म्हणजे वेदि, असें वेदांत प्रसिद्ध आहे.

'सात शिरें ज्यास आहेत त्याला' ='सप्तशीर्षाणम्.' म्हणजे कोण घ्यावयाचा तें सांगवत नाहीं. सायण मरुद्गण असें म्हणतात.

ऋभुश्चक्र ईड्यं चारु नाम विश्वानि देवो वयुनानि विद्वान् ।
ससस्य चर्म घृतवत्पदं वेस्तदिदग्नी रक्षत्यप्रयुच्छन् ॥ ६ ॥

ऋभुः । चक्रे । ईड्यम् । चारु । नाम । विश्वानि । देवः । वयुनानि । विद्वान् ।
ससस्य । चर्म । घृतऽवत् । पदम् । वेः । तत् । इत् । अग्निः । रक्षति । अप्रऽयुच्छन् ॥ ६ ॥

आ योनिमग्निर्घृतवन्तमस्थात्पृथुप्रगाणमुशन्तमुशानः ।
दीद्यानः शुचिर्ऋष्वः पावकः पुनःपुनर्मातरा नव्यसी कः ॥ ७ ॥

आ । योनिम् । अग्निः । घृतऽवन्तम् । अस्थात् । पृथुऽप्रगानम् । उशन्तम् । उशानः ।
दीद्यानः । शुचिः । ऋष्वः । पावकः । पुनःऽपुनः । मातरा । नव्यसी इति । करिति कः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. ऋभुः (=महान्) देवः (=दीप्तिमान्) [अग्निर्] विश्वानि वयुनानि (=सर्वाणि कर्माणि) विद्वान् (=जानन्) [स्वकीयं] नाम ईड्यं (=स्तुत्यं) चारु (=कमनीयं=प्रियं च) चक्रे । वेः पदं (=वेः पदे=अग्निलक्षणस्य पक्षिणः स्थाने वेद्यां) ससस्य (=स्वपतोग्नेर्) चर्म (=भस्मरूपं) घृतवत् (=दीप्तिमद्) [भवति] । अग्निः अप्रयुच्छन् (=अप्रमाद्यन्=प्रमादरहितं यथा तथा) तदित् (=तदेव) रक्षति ॥

अज्वलतोप्यग्नेर्भस्म दीप्तिमद्भाति तच्च स वेद्यां भृशं रक्षतीत्यर्थः ॥

७. अग्निर्घृतवन्तं (=दीप्तिमन्तं) योनिं (=स्वस्थानं वेदिरूपम्) आ अस्थात् (=आरुह्याध्यतिष्ठत्) । उशानः (=कामयमानोग्निः) पृथुप्रगानं (=विस्तीर्णप्रवेशम्) उशन्तं (=कामयमानं) [योनिम्] [आस्थात्] । दीद्यानः (=द्योतमानः) शुचिः (=शुद्ध) ऋष्वः (=श्रेष्ठः) पावको मातरा (=मातापितरौ=अरण्यौ) पुनःपुनर्नव्यसी (=नवीयसौ=तरुणतरे) कः (=अकः करोति) ॥

६. महान् [जो] देव [अग्नि] [ तो ] सकल कर्मे जाणणारा होत्साता [आपलें] नांव स्तुत्य [आणि ] प्रिय करिता झाला आहे. पक्ष्याचे स्थानीं निद्रित असतांहि त्याचें चर्म लखलखीत असतें. तें अग्नि जपून संभाळितो.

6. The great god [Agni] knowing all holy works, has made [his] name praiseworthy [ and ] dear. The skin of him even when sleeping [on] the seat of the Bird is brilliant. Agni protects that with care.

७. अग्नि देदीप्यमान आसनावर चढला आहे. विस्तीर्ण प्रिय [ आसना]वर प्रेमानें [ चढला आहे ]. देदीप्यमान, शुद्ध, [आणि] महान् [ असा जो ] पावक, [ तो ] [ आपल्या ] आईबापांस पुनःपुनः तरूण करितो.

7. Agni has ascended [his] brilliant seat. Lovingly he [has ascended] [his] wide [and] loving seat. Resplendent, pure [and] high, Pâvaka makes [his] parents young again and again.

---

६. 'अग्नि वेदीवर विझाला आणि केवळ भस्म राहिलें तरी तें भस्म तेजस्वी दिसतें. त्याचें वेदीवर तो संभाळून रक्षण करितो' असें दुसऱ्या पादाचें तात्पर्य.

) यांत 'पदं वेः' हें 'पदे वेः' या अर्थी घ्य[illegible] [illegible]ही अडचण आहे.

७. जा[illegible] लांकडें एकमेकांवर घांसून अग्नि पाडीत त्याचें नांव 'अरणि;' त्यांस अग्नीचीं आईबापें असें म्हणण्याची चाल आहे. त्यांतून अग्नीचा जन्म झाला तरी तीं म्हातारीं होत नाहींत. व अग्नि त्यांतून निघून वेदिरूप स्थानावर मोठ्या प्रीतीनें बसतो असें तात्पर्य.

सद्यो जात ओषधीभिर्ववक्षे यदी वर्धन्ति प्रस्वो घृतेन ।
आप इव प्रवता शुम्भमाना उरुष्यदग्निः पित्रोरुपस्थे ॥ ८ ॥

सद्यः । जातः । ओषधीभिः । ववक्षे । यदि । वर्धन्ति । प्रऽस्वः । घृतेन ।
आपःऽइव । प्रऽवता । शुम्भमानाः । उरुष्यत् । अग्निः । पित्रोः । उपऽस्थे ॥ ८ ॥

उदु ष्टुतः समिधा यह्वो अद्यौद्वर्ष्मन्दिवो अधि नाभा पृथिव्याः ।
मित्रो अग्निरीड्यो मातरिश्वा दूतो वक्षद्यजथाय देवान् ॥ ९ ॥

उत् । ऊं इति । स्तुतः । सम्ऽइधा । यह्वः । अद्यौत् । वर्ष्मन् । दिवः । अधि । नाभा । पृथिव्याः ।
मित्रः । अग्निः । ईड्यः । मातरिश्वा । आ । दूतः । वक्षत् । यजथाय । देवान् ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. जातः (=जातमात्रः) सद्यः (=क्षिप्रम्) ओषधीभिर्ववक्षे (=समिद्भिर्वर्धते)। यदि (=यस्मात्कारणात्) प्रस्वः (=ओषध्यस्) [तं] घृतेन वर्धन्ति (=स्वान्तर्भूतेन रसेन वर्धयन्ति)। प्रवता शुम्भमाना आप इव (=प्रवणेन मार्गेण सशोभं यथा तथा गच्छन्त्य आप इव) अग्निः पित्रोरुपस्थे (=मातापित्रोरुत्सङ्गे तिष्ठन्) [अस्मान्] उरुष्यत् (=रक्षतु) ॥

९. यह्वः (=महान्) [अग्निः] स्तुतः [सन्] समिधा (=तेजसा) उदु अद्यौत् (=उत्तरं द्योतमानोभूत्)— पृथिव्या अधि नाभा (=पृथिव्या नाभौ=उत्तरवेदिरूपे पृथिवीमध्यप्रदेशे) दिवो वर्ष्मन् (=आ दिवो वर्ष्मण) [उत् अद्यौत्]। मित्रः (=सर्वेषां सखिभूत) ईड्यो दूतः (=स्तुत्यो दूतभूतः) अग्निर्मातरिश्वा (=मातरिश्वनामाग्निर्) देवान् यजथाय (=यज्ञाय) आ वक्षत् (=आवहतु) ॥

अस्माभिः संदीपितः स्तुतश्च सन् यस्मादग्निर्द्युलोकपर्यन्तं प्रकाशते अतो द्युलोकाद्देवान् अत्र यज्ञ आनयत्वित्यभिप्रायः ॥

८. अग्नि उपजतांच समिधांनीं वाढतो. कारण समिधा घृतानें [ त्याला ] वाढवितात. उतरणीनें [ वाहणाऱ्या ] शोभायमान उदकांप्रमाणें अग्नि मातापितरांच्या मांडीवर [ आम्हांला ] रक्षो.

८. As soon as born he grows by the sticks, for the sticks nourish him with fat. Like waters shining on a slope, may Agni protect [us] on the lap of his parents.

९. महान् अग्नि स्तविला होत्साता तेजानें प्रकाशमान झाला आहे– पृथिवीच्या मध्यस्थानावरून द्युलोकाच्या उंचीपर्यंत [ प्रकाशमान झाला आहे ]. मैत्री करणारा, [ आणि ] स्तुत्य मातरिश्वा अग्नि दूत देवांला यज्ञासाठीं येथें आणो.

9. Being praised great Agni has shone up by his effulgence—[has shone up] on the navel of earth into the height of heaven. May Agni Mâtaris'vâ, the friendly and praiseworthy messenger, bring the gods for the sacrifice.

---

८. 'अरणींतून अग्नि उत्पन्न होतांच तो समिधांनीं वाढतो. अरणीरूप मातापितरांच्या मांडीवरून तो उतरणीवरून धांवणाऱ्या उदकांप्रमाणें बाहेर येऊन आम्हांस रक्षो.'

परंतु या ऋचेचा उत्तरार्ध किंचित् दुर्बोध आहे. कारण कीं. 'पित्रोरुपस्थे' या सप्तमी ऐवजीं 'पित्रोरुपस्थात्' असें असावयाचें होतें, आणि 'वाहणाऱ्या' या अर्थाचें पद 'आप इव प्रवता' याजबरोबर पाहिजे होतें. पाश्चात्य विद्वान् 'पित्रोरुपस्थे उरुष्यत्' याचा अर्थ 'आईबापांच्या मांडीवर (आकाशात ?) पसरो' असा करितात.

९. 'खाण्यासाठीं समिधा देत आहों व बळ येण्यासाठीं स्तुति करीत आहों, यामुळें हा अग्नि वेदीपासून स्वर्गापर्यंत पेटत आहे; तर तो स्वर्गापासून देवांला येथें आणो.'

मातरिश्वा हें अग्नीचें विशेषण आहे. सू. ९६ मं. ४ आणि टीप पहा.

उदस्तम्भीत्समिधा नाकमृष्वो३ऽग्निर्भवन्नुत्तमो रोचनानाम् ।
यदी भृगुभ्यः परि मातरिश्वा गुहा सन्तं हव्यवाहं समीधे ॥१०॥

उत् । अस्तम्भीत् । सम्ऽइधा । नाकम् । ऋष्वः । अग्निः । भवन् । उत्ऽतमः । रोचनानाम् ।
यदि । भृगुऽभ्यः । परि । मातरिश्वा । गुहा । सन्तम् । हव्यऽवाहम् । सम्ऽईधे ॥ १० ॥

इळामग्ने पुरुदंसं सनिं गोः शश्वत्तमं हवमानाय साध ।
स्यान्नः सूनुस्तनयो विजावाग्ने सा ते सुमतिर्भूत्वस्मे ॥११॥२९॥

इळाम् । अग्ने । पुरुऽदंसम् । सनिम् । गोः । शश्वत्ऽतमम् । हवमानाय । साध ।
स्यात् । नः । सूनुः । तनयः । विजाऽवा । अग्ने । सा । ते । सुऽमतिः । भूतु । अस्मे इति ॥ ११ ॥ २९ ॥

---

## भाषायाम्.

१०. यदि (=यदा) मातरिश्वा [नाम कश्चिद्] हव्यवाहं (=हविषां वोढारम्) [अग्निं] गुहा सन्तम् (=अन्तर्हितं वर्तमानं) भृगुभ्यः परि (=भृगूणां सकाशाद्) [आनीय] सम् ईधे (=समदीपयत्) तदानीम् ऋष्वः (=महान्) अग्नी रोचनानाम् उत्तमो भवन् (=सर्वेषां तेजसां मध्य उच्चैस्तमो भवन्) समिधा (=तेजसा नाकम् उदस्तम्भीत् (=स्वर्गम् उदस्तभ्नात्) ॥

भृगुभ्यः आदित्यस्य रश्मिभ्य इति सायणः । स्यात् तथा ॥

११. हे अग्ने, हवमानाय (=स्तुवते मह्यं) शश्वत्तमं (=चिरकालं यथा तथा पुरुदंसं (=प्रभूतवीरकर्माणं=प्रभूतवीरकर्मणां कारयित्रीम्) इळां (=भूमिं) गोसनिं [च] (=गवां लाभं च) साध (=साधय) । नः सूनुस्तनयः (=अस्माकं पुत्रः पौत्रश्च) विजावा स्यात् (=पुत्रपौत्रादिरूपेण स्वयं विजायत इति तथोक्तः स्यात् (=भवतु) । हे अग्ने, सा ते सुमतिः (=तव सा प्रसिद्धा सुबुद्धिरनुग्रहात्मिका अस्मे भूतु (=अस्माकं भवतु) ॥

१०. जेव्हां मातरिश्वा गुप्त असलेल्या हविर्वाहकाला भृगूंपासून आणून पेटविता झाला, तेव्हां महान् अग्नि आपल्या कान्तीनें [सर्व ] तेजांमध्यें अति उंच होऊन स्वर्गाला अंतराळीं स्तब्ध करिता झाला.

११. हे अग्नी, तुझा धांवा करणाऱ्याला तूं बहु पराक्रम करविणारी भूमि आणि गुरांची समृद्धि हीं सदैव प्राप्त करून दे. आमचे पुत्रपौत्र संतान वाढविणारे होओत. हे अग्नी, तुझी जी कृपा ती आम्हांला प्राप्त होओ.

10. Becoming the highest of all resplendent things, great Agni supported heaven through his effulgence, when Mâtaris'vâ kindled the carrier of oblation from the Bhṛigus as he lay [there] in hiding.

11. O Agni, ever and ever do thou procure for thy worshipper land full of many valorous deeds and an affluence of cows. May our sons and grandsons be prolific. O Agni, may that thy favour be ours.

---

१०. या मंत्रांत मातरिश्वा म्हणजे ज्या देवानें अग्नीला पृथिवीवर प्रथम आणिलें तो देव समजावयाचा आहे, तो कोण होय याविषयीं सू. ३१ मं. ३ आणि टीप पहा.

'भृगूंपासून' 'भृगुभ्यः परि.' म्ह० सूर्यकिरणांपासून, असें सायण म्हणतात; तसें असेल. मातरिश्वा या देवाविषयीं जें पूर्वी आम्हीं लिहिलें आहे तें पहा.

'गुप्त असलेल्या'='गुहा सन्तम्.' म्हणजे अग्नि भृगूंमध्यें (सूर्यकिरणांमध्यें) लपून राहिला होता, तेथून त्याला मातरिश्व्यानें शोधून आणिलें.

## सूक्तम् ६–२४०.

विश्वामित्र ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**प्र कारवो मनना वच्यमाना देवद्रीचीं नयत देवयन्तः ।**
**दक्षिणावाड्वाजिनी प्राच्येति हविर्भरन्त्यग्नये घृताची ॥ १ ॥**

प्र । कारवः । मनना । वच्यमानाः । देवद्रीचीम् । नयत । देवऽयन्तः । दक्षिणाऽवाट् । वाजिनी । प्राची । एति । हविः । भरन्ती । अग्नये । घृताची ॥ १ ॥

**आ रोदसी अपृणा जायमाना उत प्र रिक्था अध नु प्रयज्यो ।**
**दिवश्चिदग्ने महिना पृथिव्या वच्यन्तां ते वह्नयः सप्तजिह्वाः ॥२॥**

आ । रोदसी इति । अपृणाः । जायमानः । उत । प्र । रिक्थाः । अध । नु । प्रयज्यो इति प्रऽयज्यो ।
दिवः । चित् । अग्ने । महिना । पृथिव्याः । वच्यन्ताम् । ते । वह्नयः । सप्तऽजिह्वाः ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

१. हे कारवः (=स्तोतारः), देवयन्तः (=देवान् कामयमाना यूयं) वच्यमानाः (=धावन्तः सन्तः=अतिशयेन ससंभ्रमं यथा तथा) देवद्रीचीं (=देवान् प्रति गच्छन्तीं) [स्रुचं] प्र नयत (=हविरर्पणाय प्रधारयत)। वाजिनी (=अन्नवती) घृताची (=घृतेनोक्ता) अग्नये हविर्भरन्ती [स्रुक्] प्राची दक्षिणावाट् एति (=प्रागग्रा सती दक्षिणां दिशम् उह्यमाना गच्छति)॥

२. जायमानः (=जातमात्र एव) [त्वं] रोदसी (=द्यावापृथिव्यौ) आ अपृणाः (=आपूरयः) उत (=अपि च) हे प्रयज्यो (=यष्टव्य), अध नु प्र रिक्थाः (=ताभ्यां प्रकृष्टतरोऽप्यभवः)। हे अग्ने, महिना (=तव महिम्ना) दिवः पृथिव्याश्चित् [प्ररिक्थाः] (=द्यावापृथिवीभ्यां प्रकृष्टतरोऽभवः)। ते (=तव) सप्तजिह्वाः (=सप्तजिह्वोपेता) वह्नयः (=वाहा) वच्यन्तां (=गच्छन्तु त्वां गृहीत्वात्रागच्छन्तु)॥

## सूक्त ६–२४०.

ऋषि–विश्वामित्र. देवता–अग्नि. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. हे स्तोते हो, देवकामी जे तुम्ही ते ससंभ्रम होत्साते देवांकडे धांवणाऱ्या पळीला स्तोत्रासहित पुढें करा. अन्नवती, घृतयुक्त, अग्नीसाठीं हवि वाहणारी पळी पूर्वेकडे तोंड करून दक्षिणेकडे जाओ.

२. तूं जन्मतांच द्यावापृथिवींस भरून टाकिता झालास. आणि हे पूजनीय [ अग्नी ], तूं [ त्यांहून ] मोठा झालास. हे अग्नी, तूं [ आपल्या ] मोठेपणानें द्युलोक आणि पृथिवी यांहून [ मोठा झालास ]. तुझे जे सप्तजिह्व वाह ते येओत.

## HYMN 6–240.

To *Agni*. By *Vis'vâmitra*. Metre–*Trishṭubh*.

1. O priests, do ye, who long for the gods, actively hold forth with a hymn the ladle that will run to the gods. Rich, containing clarified butter, [and] bearing food for Agni, let it go towards the south with its end, towards the east.

2. When born thou didst fill earth and heaven and didst, o adorable one, even surpass [them]–[didst surpass], o Agni, heaven and earth by [thy] greatness. Let thy horses of seven tongues come forth.

---

१. ‘ पूर्वेकडे तोंड करून दक्षिणेकडे जाते ’=‘ दक्षिणावाट् प्राची एति.’ हा अर्थ सायणांप्रमाणें आम्हीं केला आहे. हवि देण्याच्या प्रकारास अनुलक्षून यांतील वचन आहे.

२. ‘ अग्नि उत्पन्न होतांच त्याणें आपल्या मोठेपणानें पृथिवी आणि द्युलोक यांस भरून टाकिलें आणि त्यापेक्षांहि मोठा झाला. तर हे अग्नी, तुझे घोडे तुला घेऊन येओत.’

‘ सप्तजिह्व वाह ’=‘ सप्तजिह्वा वह्नयः.’ अग्नीचे घोडे सात जिह्वांचे आहेत असें दुसरे ठिकाणीं फार प्रसिद्ध नाहीं. सायण सप्तजिह्व याचा येथें ‘ सप्तजिह्वात्मक ऋत्विक् ’ म्हणजे अग्नीच्या ज्या सात जिभा ( ज्वाळा ) तेच सात ऋत्विज् असा अर्थ करितात, आणि ‘ वच्यन्ताम् ’ याचा अर्थच करीत नाहींत, पण बहुतकरून ‘ बोलोत ’ असा त्याविषयीं त्यांचा विवक्षित अर्थ दिसतो.

**द्यौश्च॑ त्वा पृथि॒वी य॒ज्ञिया॑सो॒ नि होता॑रं सादयन्ते॒ दमा॑य ।**
**यदी॒ वि॒शो॒ मानु॑षीर्दे॒व॒यन्ती॒ः प्रय॑स्वती॒रीळ॑ते शु॒क्रम॒र्चिः ॥ ३ ॥**

द्यौः । च॒ । त्वा॒ । पृ॒थि॒वी । य॒ज्ञिया॑सः । नि । होता॑रम् । सा॒द॒य॒न्ते॒ । दमा॑य ।
यदि॑ । विशः॑ । मानु॑षीः । दे॒व॒ऽयन्तीः॑ । प्रय॑स्वतीः । ईळ॑ते । शु॒क्रम् । अ॒र्चिः ॥ ३ ॥

**म॒हान्स॒धस्थे॑ ध्रु॒व आ निष॑त्तो॒ऽन्तर्द्यावा॑ माहि॑ने॒ हर्य॑माणः ।**
**आस्क्रे॑ स॒पत्नी॑ अ॒जरे॒ अमृ॑क्ते स॒बर्दु॑घे उरुगा॒यस्य॑ धे॒नू ॥ ४ ॥**

म॒हान् । स॒धऽस्थे॑ । ध्रु॒वः । आ । निऽस॑त्तः । अ॒न्तः । द्यावा॑ । माहि॑ने॒ इति॑ । हर्य॑माणः ।
आस्क्रे॑ इति॑ । स॒पत्नी॒ इति॑ स॒ऽपत्नी॑ । अ॒जरे॒ इति॑ । अमृ॑क्ते॒ इति॑ । स॒बर्दु॑घे॒ इति॑ स॒बः॒ऽदुघे॑ । उ॒रु॒ऽगा॒यस्य॑ । धे॒नू इति॑ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. द्यौश्च पृथिवी [ च ] ( =द्यावापृथिव्यौ ) यज्ञियासः ( =पूजनीया देवाश्च दमाय ( =गृहाय ) त्वा ( =त्वां ) होतारं ( =देवानामाह्वातारं ) नि सादयन्ते ( =स्थापयन्ति स्म ) । यदि ( =यत्र गृहे ) मानुषीर्विशः ( =मनुष्यप्रजाः ) देवयन्तीः ( =देवान् कामयमानाः ) प्रयस्वतीः ( =प्रयस्वत्यः=हविरन्नयुक्ताः सत्यः ) शुक्रम् अर्चिः ( =तेजस्विनीं दीप्तिम् ) ईळते ( =स्तुवन्ति ) ॥

४. महान् हर्यमाणः ( =कामयमानः) [ स ] सधस्थे आ ( =स्वकीये स्थाने ) अन्तर्माहिने द्यावा ( =महत्योर्द्यावापृथिव्योर्मध्ये च ) ध्रुवो निषत्तः ( =अचलः सन् निषण्णो भवति=अचलं यथा तथा निषीदति ) । आस्क्रे ( =शत्रूणामास्कन्दनशीले =शत्रुजिते ) अजरे ( =सदा युवत्यौ ) अमृक्ते ( =केनाप्यहिंसिते ) सबर्दुघे (=अमृतदोग्ध्र्यौ ) सपत्नी ( =सपत्न्यौ=समानपतिके ) [ द्यावापृथिव्यौ ] उरुगायस्य (=पृथुगमनस्याग्नेः ) धेनू ( =धात्र्यौ ) [ भवतः ] ॥

सपत्नी समान एकः सूर्यः पतिर्ययोस्ते इति सायणः ॥

३. द्यू आणि पृथिवी [ आणि ] पूज्य [ देव ] ह्यांनीं तुला गृहाकरितां होता करून स्थापिलें आहे. आणि तेथें देवकामी मनुष्यलोक हविरन्न घेऊन तुझ्या लखलखीत दीप्तीला स्तवितात.

४. महान् असा जो अग्नि तो मोठ्या प्रीतीनें निरंतर आपल्या घरीं [ आणि ] महा द्यावापृथिवींच्या मध्यें बसून राहातो. आक्रमणशील, अजर, अविनाशी [ आणि ] अमृताचा पान्हा सोडणाऱ्या ज्या दोघी सवती ह्या दीर्घगामी अग्नीच्या दाया होत.

3. Heaven and earth and the adorable [gods] established thee [as] an invoker for the house, where the human races, longing for the gods, with sacrificial food with them, praise thy brilliant flame.

4. Loving [Agni] who is great sits eternal in his home and in the two great worlds. The two rival wives, victorious [and] ever young [and] indestructible [and] yielders of nectar, are the nurses of the long-striding one.

---

३. ‘ अग्नीला देवांनीं मनुष्यांच्या घरीं होता म्हणून नेमिलें आहे. तेथें ( घरीं ) मनुष्यें त्याला हवि अर्पण करून पूजितात.’

४. ‘ अग्नीला दूध पाजणाऱ्या दाया म्हटल्या म्हणजे द्यावापृथिवी होत.’

‘ आपल्या घरीं ’=‘ सधस्थे.’ म्हणजे यज्ञमंडपांत असा अर्थ आहे.

‘ दोघी सवती ’=‘ सपत्नी.’ म्हणजे द्यावापृथिवीच समजावयाच्या.

‘ दीर्घगामी ’=‘ उरुगायस्य.’ म्हणजे जिकडेतिकडे जाणारा, मोठ्या वेगानें जाणारा.

**व्रता ते अग्ने महतो महानि तव क्रत्वा रोदसी आ ततन्थ ।**
**त्वं दूतो अभवो जायमानस्त्वं नेता वृषभ चर्षणीनाम् ॥५॥२६॥**

व्रता । ते । अग्ने । महतः । महानि । तव । क्रत्वा । रोदसी इति । आ । ततन्थ ।

त्वम् । दूतः । अभवः । जायमानः । त्वम् । नेता । वृषभ । चर्षणीनाम् ॥ ५ ॥ २६ ॥

**ऋतस्य वा केशिना योग्याभिर्घृतस्नुवा रोहिता धुरि धिष्व ।**
**अथा वह देवान्देव विश्वान्त्स्वध्वरा कृणुहि जातवेदः ॥ ६ ॥**

ऋतस्य । वा । केशिना । योग्याभिः । घृतऽस्नुवा । रोहिता । धुरि । धिष्व ।

अथ । आ । वह । देवान् । देव । विश्वान् । सुऽअध्वरा । कृणुहि । जातऽवेदः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे अग्ने, महतस्तव व्रता (=व्रतानि चरितानि) महानि (=महान्ति) [सन्ति] । तव क्रत्वा (=क्रतुना=प्रज्ञया) [त्वं] रोदसी (=द्यावापृथिव्यौ) आ ततन्थ (=विस्तृतवानसि ) । त्वं जायमानः (=जातमात्र एव ) दूतोभवः । हे वृषभ (=वीर ), त्वं चर्षणीनां (=मनुष्याणां) नेता (=नायको ) [ भवसि ] ॥

६. केशिना (=केशिनौ प्रशस्तकेशवन्तौ ) घृतस्नुवा ( =घृतं क्षरन्तौ ) रोहिता (=रोहितावश्वौ ) योग्याभिः ( =रज्जुभिर् ) ऋतस्य धुरि ( =सत्यरूपस्य यज्ञस्य धुरि ) धिष्व ( =धेहि ) । अथ (=अपि च) हे देव, विश्वान् देवान् आ वह (=आनय) । [ अपि च ] हे जातवेदः, [ अस्माकं कर्माणि ] स्वध्वरा ( =स्वध्वराणि हिंसारहितानि ) कृणुहि ( =कुरु ) ॥

५. हे अग्नी, महान् जो तूं त्या तुझीं चरितें महान् [ होत ]. तूं आपल्या पराक्रमानें द्यावापृथिवींस पसरिता झालास. तूं उत्पन्न होतांच दूत झालास. हे वीरा, तूं जनांचा नायक [ आहेस ].

5. Great are thy deeds, o Agni, thou who art great. Thou didst expand the two worlds by thy wisdom. [So soon as] born thou didst become the messenger. Thou [art], o hero, the leader of the people.

६. सुंदर अयाळ असलेले, घृतस्रावी [ आणि ] आरक्त रंगाचे जे तुझे घोडे त्यांस दोऱ्यांनीं सत्याच्या धुरेला जोड. आणि हे देवा, तूं सर्व देवांला इकडे आण. हे सर्वज्ञा, तूं [ आमचीं ] यजनें निर्विघ्नपणें तडीस ने.

6. Harness with strings to the yoke of Truth the two tawny horses, shaggy [and] dropping clarified butter. And bring all the gods, o god! Make, o all-knowing [Agni], our rites free from obstruction.

---

५. 'चरितें.' म्हणजे द्यावापृथिवींस पसरून ठेविलें इत्यादिक जीं तीं.

६. 'सत्याच्या धुरेला '=' ऋतस्य धुरि.' म्हणजे सत्यरूप यज्ञ; तोच रथ अग्नीला घेऊन मनुष्यलोकाहून देवलोकीं जातो, आणि तेथून अग्नीला घेऊन पुनः पृथिवीवर येतो. त्याच्या धुरेला, असा अर्थ.

दिवश्चिदा ते रुचयन्त रोका उषो विभातीरनु भासि पूर्वीः ।
अपो यदग्न उशधग्वनेषु होतुर्मन्द्रस्य पनयन्त देवाः ॥ ७ ॥

दिवः । चित् । आ । ते । रुचयन्त । रोकाः । उषः । विऽभातीः ।
अनु । भासि । पूर्वीः ।
अपः । यत् । अग्ने । उशधक् । वनेषु । होतुः । मन्द्रस्य । पनयन्त ।
देवाः ॥ ७ ॥

उरौ वा ये अन्तरिक्षे मदन्ति दिवो वा ये रोचने सन्ति देवाः ।
ऊमा वा ये सुहवासो यजत्रा आयेमिरे रथ्यो अग्ने अश्वाः ॥८॥

उरौ । वा । ये । अन्तरिक्षे । मदन्ति । दिवः । वा । ये । रोचने ।
सन्ति । देवाः ।
ऊमाः । वा । ये । सुऽहवासः । यजत्राः । आऽयेमिरे । रथ्यः । अग्ने ।
अश्वाः ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. हे अग्ने, यद् (=यदा) वनेषु (=अरण्येषु) अप उशधक् (=उदकान्यतिशयेन दहन्) [ वर्तसे ] [ अपि च ] मन्द्रस (=स्तुत्यस,) होतुस् [ तव ] [ रोकान्=दीप्तीर् ] देवाः पनयन्त (=पनयन्ति=स्तुवन्ति ) [ तदा ] ते रोकास् (=तव दीप्तयो ) दिवश्चिदा (=द्युलोकपर्यन्तमपि ) रुचयन्त (=आरोचन्ते ) [ अपि च ] पूर्वीः (=प्रभूता ) विभातीः (=प्रकाशवतीर् ) उषसः अनुभासि ॥

८. उरौ (=विस्तीर्णे ) अन्तरिक्षे वा ये [ देवा ] मदन्ति (=हृष्यन्ति ) ये व देवा दिवो रोचने (=द्युलोकस्य प्रकाशमाने प्रदेशे ) सन्ति ये वा ऊमाः (=संरक्षण कर्तारः "ऊमसंज्ञकाः पितरः" ) सुहवासः (=शोभनाह्वाना ) यजत्राः (=पूजनीयाः ),— । हे अग्ने, रथ्यः (=रथसंबन्धिनस् ) [ तव ] अश्वा आयेमिरे (=अत्रागमनाय रथे बध्यन्ते=युज्यन्ते ),—

७. हे अग्नी, तूं जेव्हां अरण्यांत उदकें अगदी जाळून टाकणारा असा [असतोस], [आणि] [जेव्हां] तुज वर्णनीय होत्याच्या [दीप्ति] देव स्तवितात, तेव्हां तुझ्या दीप्ति द्युलोकापर्यंतहि प्रकाशतात, [आणि] तूं अनेक प्रकाशमान उषांच्या पाठोपाठ प्रकाशतोस.

7. Even up to heaven do thy rays shine, [and] thou shinest after numerous brilliant Ushases, when thou art, o Agni, a great burner of the waters in the forest, [and] when the gods praise the [rays of the] praiseworthy invôker.

८. जे [देव] विस्तीर्ण अंतरिक्षांत आनंद पावतात, अथवा जे देव द्युलोकाच्या प्रकाशपूर्ण प्रदेशांत आहेत, अथवा जे संरक्षण करणारे, सुलभाह्वान [आणि] पूज्य [देव] [आहेत],— हे अग्नी, रथाला जोडावयाचे घोडे जोडिले आहेत—,

8. Those [gods] that delight in the wide firmament, or who exist in the brilliant regions of heaven, or who [are] protectors, easily invoked [and] adorable—[thy] chariot horses, o Agni, are fastend—,

---

७. हा मंत्र जरा कठिण आहे. अक्षरार्थ बराच सोपा आहे, तरी कवीचा भावार्थ काय असेल तो स्पष्ट समजत नाहीं. 'तूं प्रतिदिनीं उषःकाळीं जागृत होतोस आणि तुझे किरण आकाशापर्यंत पोंहचतात, आणि तूं होता चांगला आहेस' असें साधारण तात्पर्य दिसतें; पण चारहि पादांचा अन्वय चांगला जुळत नाहीं.

तीस 'देवे' म्हणून जे मंत्रपुष्पांजलि देतांना म्हणतात त्यांत हा मंत्र म्हणण्याची चाल आहे. सू. १८५ मं. ९ आणि टीप पहा.

८. अंतरिक्ष, द्युलोक आणि पृथिवी यांजवरील सर्व देवांस रथाला घोडे जोडून घेऊन येण्याविषयीं यांत प्रार्थना आहे.

या मंत्रांतील 'देव' शब्दाचा अन्वय पुढच्या मंत्रांत घेतला पाहिजे.

ऐभिरग्ने सरथं याह्यर्वाङ् नानारथं वा विभवो ह्यश्वाः ।
पत्नीवतस्त्रिंशतं त्रींश्च देवाननुष्वधमा वह मादयस्व ॥ ९ ॥

आ । एभिः । अग्ने । सऽरथम् । याहि । अर्वाङ् । नानाऽरथम् । वा । विऽभवः । हि । अश्वाः ।
पत्नीऽवतः । त्रिंशतम् । त्रीन् । च । देवान् । अनुऽस्वधम् । आ । वह । मादयस्व ॥ ९ ॥

स होता यस्य रोदसी चिदुर्वी यज्ञंयज्ञमभि वृधे गृणीतः ।
प्राची अध्वरेव तस्थतुः सुमेके ऋतावरी ऋतजातस्य सत्ये॥१०॥

सः । होता । यस्य । रोदसी इति । चित् । उर्वी इति । यज्ञम्ऽयज्ञम् । अभि । वृधे । गृणीतः ।
प्राची इति । अध्वराऽइव । तस्थतुः । सुमेके इति सुऽमेके । ऋतवरी इत्यृतऽवरी । ऋतऽजातस्य । सत्ये इति ॥ १०॥

---

## भाषायाम्.

९. एभिः (=तैर्देवैः सह) हे अग्ने, सरथम् अर्वाङ् आ याहि (=एकमेव रथमधिष्ठाय अत्रागच्छ) नानारथं वा (=विभिन्नान् वा रथान् अधिष्ठाय) [आ-याहि]। हि (=यस्मात् कारणात्) [तव] अश्वा विभवः (=प्रभवो) [भवन्ति] पत्नीवतः (=पत्नीयुक्तान्) त्रिंशतं त्रींश्च देवान् अनुष्वधं (=हविरन्नमुद्दिश्य) आ वह (=आनय)। [अपि च] मादयस्व (=सोमेन हर्षं प्रापय)॥

१०. [अग्निः] स होता (=तादृशो होता) [भवति] यस्य यज्ञंयज्ञं (=सर्वं यज्ञम्) उर्वी (=उर्व्यौ=विस्तीर्णे) रोदसी चित् (=द्यावापृथिव्यावपि) वृधे अभि गृणीतः (=अभिवृद्धये प्रशंसतः=समीचीनो यज्ञोयमिति प्रशंसां कृत्वा तं यज्ञमभिवृद्धं सफलं कुरुतः)। सुमेके (=सुरूपे) ऋतावरी (=सत्यवत्यौ) सत्ये (=सत्यस्वरूपे) [द्यावापृथिव्यौ] ऋतजातस्य (=सत्यजातस्य सत्यरूपाय यज्ञायोद्भूतस्य) अध्वरेव (=यज्ञाविव) प्राची (=अनुकूले) तस्थतुः (=तिष्ठतः)॥

उत्तरार्धे स्थितोपमा दुर्बोधा॥

रोदसीपदेनात्र द्यावापृथिवीगता देवा बोद्धव्या भवन्ति॥

९. त्यांसहित हे अग्नी, तूं एकाच रथांत बसून ये अथवा तुम्ही वेगवेगळ्या रथांत बसून [ यां ]. कारण [ तुझे ] घोडे शक्तिमान् [ आहेत ]. तूं तीस आणि तीन देवांला त्यांच्या पत्नींसहित हविरन्नासाठीं घेऊन ये आणि आनंद पाव.

9. with those come, o Agni, hither in a common chariot or in separate chariots. For strong [are] [thy] horses. Bring to the oblation the thirty and three gods with their wives [and] be exhilarated.

१०. [ अग्नि ] असला होता [ आहे ] कीं विस्तीर्ण द्यावापृथिवीहि त्याच्या प्रत्येक यज्ञाची प्रशंसा करून अभिवृद्धि करितात. सुरूप, धर्ममय आणि सत्य अशा ज्या द्यावापृथिवी त्या सत्यजात [ अग्नी]ला अध्वरांप्रमाणें अनुकूल [ होऊन ] उभ्या राहतात.

10. [Agni] is such a minister that even vast Heaven and Earth commend and prosper all his sacrifices. The beautiful, righteous [and] truthful [Heaven and Earth] stand favourable to the Truth-born like two sacrifices.

---

९. 'तीस आणि तीन देव' म्हणजे तेहतीस देव. सू. ३४ मं. ११ आणि टीप पहा.

१०. 'द्यावापृथिवी' प्रशंसा करितात म्हणजे द्यावापृथिवींत राहणारे जे जे म्हणून देव आहेत ते प्रशंसा करितात असें समजावयाचें आहे.

'अध्वरांप्रमाणें अनुकूळ होऊन उभ्या राहतात' हें 'अध्वरेव प्राची तस्थतुः' याचें भाषांतर सायणानुसार केलें आहे. पण त्या उपमेचा भावार्थ समजत नाहीं. मंत्राचा आम्हीं अक्षरशः अर्थ दिला आहे.

इळामग्ने पुरुदंसं सनिं गोः शश्वत्तमं हवमानाय साध ।
स्यान्नः सूनुस्तनयो विजावाग्ने सा ते सुमतिर्भूत्वस्मे ॥
॥ ११ ॥ २७ ॥ ८ ॥ २ ॥

इळाम् । अग्ने । पुरुऽदंसम् । सनिम् । गोः । शश्वत्ऽतमम् । हवमानाय । साध ।
स्यात् । नः । सूनुः । तनयः । विजाऽवा । अग्ने । सा । ते । सुऽमतिः । भूतु । अस्मे इति ॥ ११ ॥ २७ ॥ ८ ॥ २ ॥

## समाप्तोयं द्वितीयोष्टकः ।

---

### भाषायाम्.

११. हे अग्ने, हवमानाय (=स्तुवते मह्यं) शश्वत्तमं (=चिरकालं यथा तथा) पुरुदंसं (=प्रभूतवीरकर्माणं=प्रभूतवीरकर्मणां कारयित्रीम्) इळां (=भूमिं) गोः सनिं [च] (=गवां लाभं च) साध (=साधय)। नः सूनुस्तनयः (=अस्माकं पुत्रः पौत्रश्च) विजावा स्यात् (=पुत्रपौत्रादिरूपेण स्वयं विजायत इति तथोक्तः) स्यात् (=भवतु)। हे अग्ने, सा ते सुमतिः (=सा तव प्रसिद्धा सुबुद्धिरनुग्रहात्मिका) अस्मे भूतु (=अस्माकं भवतु)॥

। समाप्तेयं द्वितीयाष्टकस्य व्याख्या ।

११. हे अग्नी, तुझा धांवा करणाऱ्याला तूं बहु पराक्रम करविणारी भूमि आणि गुरांची समृद्धि हीं सदैव प्राप्त करून दे. आमचे पुत्रपौत्र संतान वाढविणारे होओत. हे अग्नी, तुझी जी कृपा ती आम्हांला प्राप्त होओ.

11. O Agni, ever and ever do thou procure for thy worshipper land full of many valorous deeds and an affluence of cows. May our sons and grandsons be prolific. O Agni, may that thy favour be ours.

११. येथें दुसरा अष्टक संपला आणि या पुढें तिसऱ्या अष्टकाला आरंभ होईल.

## ॥ अथ तृतीयाष्टके प्रथमोध्यायः ॥

### सूक्तम् ७-२४१.

मण्डलद्रष्टा विश्वामित्र ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**प्र य आरुः शितिपृष्ठस्य धासेरा मातरा विविशुः सप्त वाणीः**
**परिक्षिता पितरा सं चरेते प्र सर्स्राते दीर्घमायुः प्रयक्षे ॥ १ ॥**

प्र । ये । आरुः । शितिऽपृष्ठस्य । धासेः । आ । मातरा । विविशुः सप्त । वाणीः ।
परिऽक्षिता । पितरा । सम् । चरेते इति । प्र । सस्राते इति । दीर्घम् । आयुः । प्रऽयक्षे ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. शितिपृष्ठस्य (=श्वेतपृष्ठस्य) धासेः (=पोषकस्याग्नेः) ये [रश्मयः] प्रारुः (=प्रकर्षेणोद्गच्छन्ति) [ते] मातरा (=जगतः पितरौ द्यावापृथिव्यौ) सप्त वाणीः (=सप्त सिन्धून्=अन्तरिक्षं) [च] आ विविशुः (=सर्वतः प्रविशन्ति)। परिक्षिता (=परिक्षितौ सर्वव्यापिनौ) पितरा (=पितरौ जगतो मातापितरौ द्यावापृथिव्यौ) दीर्घमायुः प्रयक्षे (=प्रदातुं) सं चरेते प्र सस्राते (=सम्यक्चरेते प्रकर्षेणात्मानं प्रसारयतश्च) ॥

अग्नेर्दीप्तयो यदा प्रकर्षेणोद्गच्छन्ति तदा ता अत्यन्तमहत्त्वात् त्रिलोकान् प्रविशन्ति। द्यावापृथिव्यौ च तस्मै मनुष्येभ्यश्च दीर्घमायुर्दातुं संचरतः आत्मानं च प्रसारयत इति भावः ॥

## अष्टक ३, अध्याय १.

## ASHTAKA III, ADHAYA I.

### सूक्त ७–२४१.

ऋषि–विश्वामित्र. देवता–अग्नि. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. श्वेतपृष्ठ पोषक [अग्नी]-चे जे [किरण] वर जातात, [ते] [जगाच्या] आईबापांचे ठायीं [आणि] अंतरिक्षाचे ठायीं प्रवेश करितात. सर्वव्यापी आईबाप दीर्घ आयुष्य देण्याकरितां संचार करितात [आणि] प्रसार पावतात.

### HYMN 7–241.

To *Agni*. By *Vis'vâmitra*. Metre—*Trishtubh*.

1. The rays of the white-backed nourisher [Agni] that start forth enter into the [universal] parents [Earth and Heaven] [and] into the firmament. The two parents that spread everywhere move together and lie expanded for to give long life.

---

१. हें तिसऱ्या अष्टकाचें पहिलें सूक्त कठिण आहे. या सर्वांत जरी अग्नीविषयीं सांगितलें आहे, तरी तें सर्व वर्णन जाणूनबुजून जणुं दुर्बोध आणि अनार्थ शब्दांनीं केलेलें असल्यामुळें खरा भावार्थ समजण्यास सर्व मंत्रांत एकसारखीं सुलभ साधनें नाहींत.

'अग्नीच्या दीप्ति वर जाऊं लागल्या म्हणजे त्या थोडक्या अंतरापर्यंत जातात असें नाहीं. तर पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक यांस भरून टाकितात. द्यावापृथिवींचा संचार चालतो म्हणून लोक जगतात.' असा भावार्थ.

दिवक्षसो धेनवो वृष्णो अश्वा देवीरा तस्थौ मधुमद्वहन्तीः ।
ऋतस्य त्वा सदसि क्षेमयन्तं पर्येका चरति वर्तनिं गौः ॥ २ ॥
दिवक्षसः । धेनवः । वृष्णः । अश्वाः । देवीः । आ । तस्थौ । मधुऽमत् । वहन्तीः ।
ऋतस्य । त्वा । सदसि । क्षेमऽयन्तम् । परि । एका । चरति । वर्तनिम् । गौः ॥ २ ॥

आ सीमरोहत्सुयमा भवन्तीः पतिश्चिकित्वान्रयिविद्रयीणाम् ।
प्र नीलपृष्ठो अतसस्य धासेस्ता अवासयत्पुरुधप्रतीकः ॥ ३ ॥
आ । सीम् । अरोहत् । सुऽयमाः । भवन्तीः । पतिः । चिकित्वान् रयिऽवित् । रयीणाम् ।
प्र । नीलऽपृष्ठः । अतसस्य । धासेः । ताः । अवासयत् । पुरुधऽप्रतीकः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. दिवक्षसः ( =दिवं व्याप्य वर्तमाना ) अश्वाः ( =" वाहनरूपा रोहिताः") वृष्णः ( =अग्निलक्षणस्य वीरस्य ) धेनवः (=पयसा प्रीणयित्र्यो धात्र्यो ) [भवन्ति] । मधुमद् वहन्तीः ( =माधुर्योपेतं रसं वहन्तीर् ) देवीः ( " =द्योतनशीला नद्यः" ) [ स ] आ तस्थौ ( =आतिष्ठति ) ।—[ हे अग्ने ], ऋतस्य सदसि क्षेमयन्तं (=सत्यरूपस्य यज्ञस्य गृहे वासमिच्छन्तं ) त्वा ( =त्वां प्रति ) एका गौः ( =? ) वर्तनिं परि चरति ( =मार्गं परिक्रामति=मार्गं परिक्राम्यागच्छति ) ॥

गोशब्दो माध्यमिकवाग्वाची माध्यमिकां वाचमिति नैरुक्ता इत्यभिधानात् । एका गौः काचिदुक्तविधा वाक् ऋतस्योदकस्य सदसि स्थानेऽन्तरिक्षे क्षेमयन्तं क्षेममावासमिच्छन्तम् । इति सायणः ॥

३. चिकित्वान् ( =ज्ञातवान् ) रयीणां ( =धनानां ) रयिवित् पतिः ( =धनस्य लम्भयिता स्वामी ) [ स ] सुयमाः ( =सुखेन नियन्तुं शक्या ) भवन्तीः सीं (=ता) आ अरोहत् ( =आरोहत् ) । नीलपृष्ठः पुरुधप्रतीकः ( =बहुधा विक्षिप्ताङ्गः ) [ सोऽग्निर् ] अतसस्य धासेः ( =? " सततगमनस्य पोषणार्थं " ) ताः ( =अश्वाः ) प्र अवासयत् ( =प्रावासयत्=प्रवासं कारयति ) ॥

२. द्युलोकाला व्यापणाऱ्या घोड्या अग्निवीराच्या धात्री [होत]. मधुर रसातें वाहणाऱ्या ज्या त्या देवी त्यांजवर तो बसत असतो.—[ हे अग्नी ], सत्याच्या गृहांत आराम इच्छिणाऱ्या तुजप्रत एक गाय मार्ग चालून येते.

३. संपत्तींचा संपत्तिदायक ज्ञानी प्रभु [ अग्नि ] सुयंत्र होणाऱ्या [ ज्या घोड्या], त्यांजवर आरूढ होतो. नीलपृष्ठ [आणि] दोहींकडे पाहणारा [ अग्नि ] त्यांजकडून गमनाच्या पोषणासाठीं वास करवितो.

2. The mares that dwell in heaven [are] the nurses of the hero. He mounts on them, the goddesses that bear the sweet beverage.—To thee who dost desire rest in the home of Truth, one cow comes traversing the road.

3. He the wise lord of riches, that gives riches, mounts them when they become easily controllable. Possessed of a black back [ and ] looking in many directions he causes them to live abroad "for improving their speed."

---

२. या सूक्तांतील इतर ऋचांप्रमाणें ह्याहि ऋचा गूढार्थक आहे. आम्हीं अक्षरशः अर्थ केला आहे, पण 'मधुर रसातें वाहणाऱ्या घोड्या' म्हणजे अंतरिक्षांतील मेघमालारूप नद्या होत कीं काय, आणि 'सत्याचें गृह' म्हणजे अंतरिक्ष किंवा यज्ञमंडप घ्यावयाचा कीं काय, आणि 'एक गाय' सांगितली तो कोणती, या सर्वांविषयीं मोठा संशय आहे.

३. हा मंत्र अत्यंत दुर्बोध आहे. पूर्वार्धाचा भावार्थ असा दिसतो कीं, अग्नि अंतरिक्षस्थमेघमालारूप ज्या घोड्या त्यांजवर बसतो.' परंतु दुसऱ्या अर्धाचा कांहींच भावार्थ समजत नाहीं. आम्हीं अर्थ केवळ अक्षरशः दिला आहे. 'अतसस्य धासेः' आणि 'प्रावासयत्' या पदांचा अर्थ कळत नाहीं. सायणांनीं त्यांचा केलेला अर्थ भाषेंत जाणविला आहे. •

हें सूक्त संपेपर्यंत वाचकांनीं धीर धरणें अवश्य आहे. या मंत्रांचा अर्थ आम्ही अक्षरशः देऊं, पण भावार्थाची बहुधा कल्पना मात्र करूं. दुसरा उपाय नाहीं.

महि त्वाष्ट्रमूर्जयन्तीरजुर्यं स्तभूयमानं वहतो वहन्ति ।
व्यङ्गेभिर्दिद्युतानः सधस्थ एकामिव रोदसी आ विवेश ॥ ४ ॥

महि । त्वाष्ट्रम् । ऊर्जयन्तीः । अजुर्यम् । स्तभुऽयमानम् । वहतः । वहन्ति ।
वि । अङ्गेभिः । दिद्युतानः । सधऽस्थे । एकाम्ऽइव । रोदसी इति । आ । विवेश ॥ ४ ॥

जानन्ति वृष्णो अरुषस्य शेवमुत ब्रध्नस्य शासने रणन्ति ।
दिवोरुचः सुरुचो रोचमाना इळा येषां गण्या माहिना गीः ॥ ५ ॥ १ ॥

जानन्ति । वृष्णः । अरुषस्य । शेवम् । उत । ब्रध्नस्य । शासने । रणन्ति ।
दिवःऽरुचः । सुऽरुचः । रोचमानाः । इळा । येषाम् । गण्या । माहिना । गीः ॥ ५ ॥ १ ॥

---

इयमपि दुर्बोधार्था ॥ प्रावासयत् प्रकर्षेण वासयति स्म । निवासेन श्रमेपर्नाते सततगमनं पोषयितुं शक्यम् इत्यर्थः इति सायणः ॥

वस्तुतस्तु उत्तरार्धोऽज्ञातभावार्थः । विशेषतश्च अतसस्य धासेरिति पदद्वयमतिशयेन गूढार्थकम् ॥

---

## भाषायाम्.

४. अजुर्यं (=जरयितुम् अनर्हम्=अविनाशिनं) स्तभूयमानं (=स्वस्य धारणम् अचलत्वमिच्छन्तं) त्वाष्ट्रं (=त्वष्टुः पुत्रम् अग्निं) महि (=प्रभूतं यथा तथा) ऊर्जयन्तीः (=ऊर्जयन्त्यो=बलिनं कुर्वन्त्यो) वहतः (=नद्यो) वहन्ति (=धारयन्ति) । सधस्थे (=स्वकीये स्थाने) अङ्गेभिः (=अङ्गैः स्वकीयैरवयवैः) वि दिद्युतानः (=विशेषेण दीप्यमानः) [स] एकामिव रोदसी आ विवेश (=द्यावापृथिव्योर्मध्य एकामिव उभे द्यावापृथिव्यौ प्रविशति) ॥

५. अरुषस्य वृष्णः (=आरोचमानस्य वीरस्य अग्निरूपस्य) शेवं (=सुखं=तेन दत्तं सुखं) [जना] जानन्ति । उत (=अपि च) ब्रध्नस्य (=महतोऽग्नेः) शासने

४. अविनाशी आणि हालूं नये अशा निश्चयानें उभा राहाणारा जो त्वष्ट्याचा पुत्र, त्याला नद्या अतिशय प्रबळ करून वाहतात. [ आपल्या ] स्थानीं सर्व अवयवांनीं प्रकाशणारा [ अग्नि ] एकीमध्यें [ प्रवेश केल्या]प्रमाणें उभय ज्या द्यावापृथिवी त्यांमध्यें प्रवेश करितो.

4. The rivers carry [him], greatly invigorating him, the son of Tvashtâ, indestructible and immovable. Shining in all directions with [his] limbs he enters the two worlds as if he entered [only] one.

५. आरक्त [ जो अग्नि]वीर त्याचें सुख [ जन ] जाणतात, आणि ते महान् [अग्नी]च्या आज्ञेत रममाण होतात. ज्यांची आहुति [ आणि] महा वाणी पूज्य [होय] ते द्युलोकापर्यंत प्रकाशणारे, उत्तम प्रकाशणारे [ आणि ] तेजस्वी [ होतात ].

5. They know the blessing of the tawny hero and remain with delight under the command of the great [Agni]. They whose oblation and great hymn [is] praiseworthy shine as far as heaven, become highly brilliant, [and] resplendent.

---

४. हाहि मंत्र कठिण आहे. भावार्थ असा दिसतो कीं, 'मेघमालारूप ज्या घोड्या, त्या अचल अग्नीला वाहतात; आणि अग्नि जेव्हां अंतरिक्षांत विद्युद्रूपानें प्रकाशतो, तेव्हां तो उभय लोकास एकदम व्यापून टाकितो.'

तथापि 'एकीमध्यें प्रवेश केल्याप्रमाणें' असें आहे त्याचा वास्तविक भावार्थ काय आहे, तें निश्चयानें सांगणें कठिण आहे.

५. अग्नीच्या आज्ञेप्रमाणें वर्तल्यापासून काय लाभ आहे तो जन जाणतात, आणि म्हणूनच त्यांचें शासन ते उल्लंघन करीत नाहींत. म्हणजे, त्याला आहुतींनीं आणि स्तोत्रांनीं भजतात व तसें करून अग्नीप्रमाणें अत्यंत दीप्तिमंत होतात, असा भावार्थ.

